**अण्णा भाऊ साठे** (1920-1969) : कुठलेही औपचारिक शिक्षण नसलेले अण्णा भाऊ साठे हे एक प्रख्यात लेखक झाले हे मराठी साहित्याच्या इतिहासातील एक आश्चर्य आहे. सर्वमान्यतेने पहिले लढाऊ व समर्थ दलित लेखक म्हणून ओळखल्या जाणाऱ्या अण्णा भाऊंनी दलित लेखकांच्या पुढील पिढ्यांसाठी दीपस्तंभाचे कार्य केले. स्वातंत्र्यपूर्व काळातील व स्वातंत्र्यानंतरच्या काही काळातील महाराष्ट्राच्या ग्रामीण जीवनाचे व संस्कृतीचे ते पहिले प्रमुख इतिवृत्तकार होते, कारण त्या जीवनाचे व संस्कृतीचे त्यांना सखोल आकलन होते व प्रत्यक्ष अनुभवसुद्धा होता.

भटक्या व पददलित अशा समाजाच्या दुर्लक्षित घटकांवर जवळजवळ प्रथमच प्रामाणिक, समर्थ व प्रत्ययकारी लेखन करून त्यांनी अगदी नवीनच विषयांची खाण मराठी साहित्यात उघडली.

महाराष्ट्रात सर्वाधिक लोकप्रिय असलेल्या 'तमाशा'या लोककलेचे त्यांनीच 'लोकनाट्या'मध्ये रूपांतर करून त्या कलेला गांभीर्य, प्रतिष्ठा व सामाजिक मान्यता मिळवून दिली.

स्वतः तळागाळातील समाजातून आलेले असल्याने व जन्मभर त्याच पातळीवरील आयुष्य जगल्याने ते कधीही हस्तिदंती मनोऱ्यातील लेखक बनले नाहीत. स्वतः गरीब वर्गातील असल्याने ते केवळ कवि, कथाकार व कादंबरीकारच नव्हते, तर कम्युनिस्ट पक्षाचे निष्ठावंत असे सक्रिय कार्यकर्तेही होते. कम्युनिझमच्या अंधानुकरणापासून त्यांनी स्वतःला दूर ठेवल्याने जे लोक कम्युनिस्ट नाहीत, अशांच्या हृदयालाही त्यांचे साहित्य हात घालते.

**बजरंग सुखदेवराव कोरडे** (जन्म 1956) हे या आलेखाचे लेखक महाराष्ट्रातील औरंगाबादमधील मराठवाडा विद्यापीठातून (आताचे डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ) इंग्लिश साहित्यात पी.एच्.डी. झालेले असून सध्या पुणे विद्यापीठाच्या इंग्लिश विभागात प्रपाठक म्हणून कार्यरत आहेत.



Anna Bhau Sathe (Marathi), Rs. 40
ISBN 81-260-1142-4



भारतीय साहित्याचे निर्माते

# अण्णा भाऊ साठे

बजरंग कोरडे



# अनुक्रमणिका

# 1

# जीवन-चरित्र

अण्णा भाऊ साठे यांचा जन्म 1 ऑगस्ट 1920 रोजी वाटेगावच्या मांगवाड्यात झाला. वाटेगाव हे खेडे सध्याच्या सांगली जिल्ह्याच्या (पूर्वीचा दक्षिण सातारा जिल्हा) वाळवा तालुक्यात, पुणे-बंगलोर महामार्गावरील कासेगावच्या तीन मैल पूर्वेला आहे. त्या काळच्या जातिप्रथेनुसार अण्णा भाऊ हे मांग जातीचे होते. मांग समाज हा महाराष्ट्रातील सर्वात मागास आणि दलित असा समाज म्हणून ओळखला जात असे. जुन्या काळच्या प्रथेनुसार मांगवाडा वाटेगावच्या पूर्वेला दोन फर्लांग अंतरावर होता, आणि अद्यापही तो तेथेच आहे. त्यामुळे, मांगांच्या झोपड्या या तथाकथित पुढारलेल्या जातीच्या लोकांच्या घरांपासून दूर अंतरावर होत्या. वाटेगावच्या मांगवाड्यात मांगांच्या सुमारे शंभर झोपड्या त्या काळी होत्या व अद्यापही आहेत. याच मांगवाड्यातील एका झोपडीत अण्णा भाऊ साठे यांचा जन्म झाला.

अण्णा भाऊंची जात ही शूद्र जातींपैकी एक होती. त्या जातीतील लोकांना उत्पन्नाचे कुठलेही खात्रीशीर साधन नव्हते. ब्रिटिश सरकारच्या नोंदींनुसार मांग ही जात एक गुन्हेगार जात म्हणून ओळखली जात असे. त्यामुळे पोलीस जेव्हा अटकसत्र सुरू करीत, तेव्हा मांगवाड्यातील हे मांग अटक टाळण्यासाठी एका रात्रीत अनेक मैल पायी चालत दुसऱ्या ठिकाणी जात. त्यांची साधी चटणी-भाकरीची गरजही पुरी होत नसल्याने ते शिक्षण घेऊन सुसंस्कृत होण्याचे स्वप्नसुद्धा पाहू शकत नसत – मग वाङ्मयीन जाण तर दूरच राहिली! या समाजाच्या अशा भटक्या जीवनामुळे अण्णा भाऊंच्या कुटुंबासंदर्भात सलग अशा नोंदी मिळवण्यात एका मर्यादेपलिकडे अडचणीच येतात. तरीही, ज्या काही त्रोटक नोंदी मिळतात, त्या अशाः

अण्णा भाऊंचे पूर्वज सुमारे दीडशे वर्षांपूर्वी वाटेगाव येथे स्थायिक झाले. त्यांचे पणजोबा राघोबा हे 1818 ते 1872 या कालखंडात वाटेगाव येथे रहात होते. राघोबा यांचा जीवनकाळ 1899 पर्यंत असावा. सिधोजी यांना 'भाऊ' नांवाचा एक मुलगा होता. 'भाऊ' हे सिधोजींचे पुत्र हेच अण्णा भाऊ यांचे वडील. अण्णांच्या आईचे नांव वालूबाई असे होते. त्या कोल्हापूर जिल्ह्यातील हातकणंगले तालुक्यामधल्या ताळसंडे गावच्या अण्णा कामा मांग यांच्या कन्या होत्या. अण्णा भाऊंच्या मातुल आजोबांचे नांवही 'अण्णा' असेच होते. वालूबाई आणि भाऊ साठे यांचा विवाह 1912 च्या सुमारास झाला. अण्णा भाऊंच्या आई-वडिलांना एकूण पाच अपत्ये झाली, ती अशी–

1) भागूबाई (1918)
2) तुकाराम (1 ऑगस्ट 1920)
3) शंकर (1922) : बालपणातच मृत्यू
4) शंकर (1925) : आधी निधन झालेल्या मुलाची आठवण म्हणून याही मुलाचे नांव 'शंकर' असेच ठेवण्यात आले.
5) जाईबाई.

अण्णा भाऊंचे मूळ नांव होते तुकाराम. ज्येष्ठ व्यक्तीला आदर दाखवण्यासाठी तिला तिच्या मूळ नांवाने हाक न मारता आदरार्थी अशा संबोधनाने हाक मारण्याची प्रथा ग्रामीण भागात होती. तुकाराम हे कुटुंबातील ज्येष्ठ पुत्र असल्याने कुटुंबातील लोक त्यांना आदराने व प्रेमाने 'अण्णा' म्हणून हाक मारीत. त्यामुळे त्यांचे मूळचे 'तुकाराम' हे नांव मागे पडून 'अण्णा' हेच नाव कायमचे प्रचलित झाले.

अण्णा भाऊंचे बालपण अतिशय गरिबीत गेले. त्यांचे वडील श्री. भाऊ साठे यांच्या मालकीची वीस गुंठे जमीन होती. पण जमिनीच्या निकसपणामुळे आणि दुष्काळामुळे, त्या जमिनीतून येणारे पीक साठे कुटुंबियांना वर्षातील दोनेक महिनेच पुरत असे.

फकिरा हे अण्णा भाऊंचे मामा होते. त्यांनी ब्रिटिशांविरुद्ध बंड केले होते. 1925 मध्ये गुन्हेगार जमातींच्या वसाहतींचा कायदा पास झाला व तो अण्णा भाऊंच्या समाजावर लादण्यात आला. फकिरा यांच्या बंडात साठे कुटुंबीयसुद्धा सहभागी असल्याने त्यांच्यामागेही ब्रिटिश सरकारचा ससेमिरा होताच. त्यामुळे कुठेही एकादी चोरी किंवा खून झाला, तरी साठे यांच्या घराची झडती घेतली जाई. कधीकधी सगळ्या कुटुंबियांना उपाशी रहावे लागे.

अशा जीवनाचा उबग आल्याने अण्णांचे वडील श्री. भाऊ साठे हे आपल्या



कुटुंबियांना वाटेगाव येथेच ठेवून एकटेच नोकरी शोधण्यासाठी मुंबईला गेले. भाऊ हे उत्तम शेतीतज्ज्ञ व माळी होते.

भाऊ जरी मुंबईला गेले, तरी निसर्गाबद्दल वाटणारे प्रेम ते विसरू शकत नव्हते. मुंबईसारख्या औद्योगिक शहरातही ते फुलझाडे वाढवणे, बागांची मशागत करणे, झाडांच्या रोगांवरती उपचार करणे, मेंदीची कुंपणे नीट कापून देणे अशी कामे करीत. त्यामुळे त्यांना माळी म्हणून काम मिळू लागले. हे काम भाऊ मनापासून आणि आवडीने करीत. या कामामुळे त्यांना आर्थिक प्राप्तीही बऱ्यापैकी होऊ लागली. आपल्या माळीकामामुळे तत्कालीन मुंबईतील उच्चवर्गीय आणि उच्चशिक्षित समाजाचे जीवन त्यांना जवळून पहायला मिळाले. त्यामुळे, आपल्या मुलांनीही उच्च शिक्षण घ्यावे आणि आपण पाहिलेल्या उच्चशिक्षित लोकांप्रमाणेच आपल्या मुलांनीही समृद्ध जीवन जगावे असे त्यांना वाटू लागले. या भावनेचा परिणाम म्हणून त्यांनी घराकडे पाच ते दहा रुपयांच्या मनीऑर्डरी करायला सुरुवात केली व 'तुकाराम (अण्णा) ला गावच्या शाळेत घालावे' असे पत्नीला कळवले.

अण्णा भाऊंचे शिक्षण कुठपर्यंत झाले होते याबद्दल मतभेद आहेत. म्हणतात की ते दुसरीपर्यंत शिकले होते, तर काहीजण म्हणतात की ते व्हर्नाक्युलर फायनल (म्हणजेच इयत्ता सातवी) पर्यंत शिकले होते. पण ही मते कुठल्याही तथ्यावर आधारलेली नाहीत; आणि ती सिद्ध करण्यासाठी काही पुरावाही नाही. त्यामुळे अण्णा भाऊ नक्की कितव्या इयत्तेपर्यंत शिकले होते हे सांगणे अशक्य आहे.

बालपणातील अण्णा भाऊंच्या घडणीमध्ये मोठ्या प्रमाणात त्यांच्या स्वतःच्याच शारीरिक आणि मानसिक सवयींचा वाटा आहे. जनसमुदायापासून दूर जाऊन डोंगर, दऱ्या, रानेवने, गुहा आणि नदीकाठ अशा ठिकाणी भटकण्याची त्यांना सवय होती.

आसपासच्या खेड्यांतील जत्रा पहाणे त्यांना आवडत असे. या जत्रांमधील दुकाने, माणसे, तंबू, राहुट्या, कुस्त्या, कोल्हाट्यांच्या कसरती, तमाशे, पूजा, दैवतांच्या पालख्या, त्यांच्या मिरवणुकी, मुरळ्यांची नृत्ये व गाणी यांचे अण्णा भाऊ बारकाईने निरीक्षण करीत. असे म्हणतात, की आपल्या गावच्या पंधरा मैलांच्या परिसरातील जत्रा पहाण्याची एकही संधी त्यांनी सोडली नाही.

1932 ते 1936 या कालखंडात अण्णा भाऊंच्या आधीच्या आवडींमध्ये आणखी काही आवडींची भर पडली. या आवडी म्हणजे लोकगीते, स्तवने, पोवाडे पाठ करणे, ते आवाजाच्या वरच्या पट्टीत गाणे; साहसकथा, शिकारकथा,

लोककथा, दंतकथा व भूतकथा ऐकणे आणि त्या इतरांना सांगणे. या आवडींमुळे त्यांच्याभोवती समानशील व समवयस्क असे काही मित्र जमा झाले. मुले एकत्र जमवणे, त्यांना गोष्टी सांगणे, मध गोळा करणे आणि अनिर्बंधपणे भटकणे हे अण्णा भाऊंचे उद्योग चालू राहिले.

या मुलांपुढे दोन पर्याय असत. गरिबांची मुले बहुधा आपल्या परंपरागत व्यवसायाकडे वळत, तर सधन कुटुंबातील मुले स्वातंत्र्य मिळवण्यासाठी चाललेल्या राष्ट्रीय चळवळीत उडी घेत. ही चळवळ कशा मार्गाने चालवावी याबद्दल मतभेद असले, तरी त्यांच्यापैकी बहुतेकांचे पुढील तीन मुद्यांबाबत एकमत होतेः

1. राजकीय स्वातंत्र्य मिळवणे.
2. ब्रिटिशांना भारताबाहेर हाकलून देणे.
3. ब्रिटिशांना मदत करणाऱ्यांना उखडून फेकणे.

ही चळवळ समाजाच्या अगदी तळापर्यंत पोचली होती.

## पहिला संस्कार

अण्णा भाऊ आपल्या एका मावसभावाच्या तमाशापार्टीबरोबर जत्रांना जात असत. एकदा रेठरे (तालुका वाळवा, जिल्हा सांगली) गावच्या जत्रेत रात्री तमाशाचा खेळ चालू असताना अनपेक्षितपणे तिथे क्रांतिसिंह नाना पाटील आले. त्यांचे भाषणही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाइतकेच प्रेरणादायक होते. अण्णा भाऊंनी आयुष्यात प्रथमच इतके ओजस्वी व जोरदार भाषण ऐकले. या भाषणाचा परिणाम होऊन अण्णा भाऊंनी स्वातंत्र्यलढ्यात उडी घेतली. या लढ्यात सहभागी असल्याने ते अधूनमधून भूमिगत होत.

त्यांच्या अशा अनिर्बंध वर्तणुकीमुळे त्यांच्या आई वालुबाईंनी आपले पती श्री. भाऊ यांना, त्यांनी आपले सारे कुटुंब मुंबईला न्यावे असे आग्रहाने विनवले. तसे न केल्यास अण्णा हाताबाहेर जाईल असे त्यांचे मत होते. वालुबाईंच्या आग्रहामुळे, मुंबईत त्यांच्या रहाण्याची कुठल्याही प्रकारची सोय झालेली नसतानाही श्री. भाऊ साठे यांनी आपले कुटुंब मुंबईला हलवायचे ठरवले. 1931 च्या सुगीच्या मोसमात साठे कुटुंबीय वाटेगावहून पायी चालत मुंबईला जाण्यासाठी निघाले. मुंबईला पायी चालत जात असताना वालुबाईंनी जाईला पाठुंगळी घेतले होते, तर अण्णा भाऊंनी सामानाचे गाठोडे डोक्यावर घेतले होते. एका हाताने गाठोडे सावरीत दुसऱ्या हाताने त्यांनी सहा वर्षांच्या शंकरचे बोट धरले होते.



साठे कुटुंबियांचा वाटेगाव ते मुंबई हा प्रवास अत्यंत कष्टप्रद झाला. बराचसा प्रवास त्यांनी मार्गातल्या खेड्यांमधून केला. अधूनमधून, काही दिवसांच्या प्रवासानंतर त्यांना शहरे लागत. शहरांमध्ये त्यांना हमालीचे काम मिळे व मुक्कामही थोडा अधिक होई. थोडी विश्रांती मिळे. सातारा आणि पुणे या शहरांत ते अनुक्रमे आठ आणि बारा दिवस राहिले. ते खेड्यांमधून आणि शहरांमधून प्रवास करीत होते, तोवर ठीक होते. परंतु, पुण्यानंतर त्यांना खडकाळ, डोंगराळ आणि दाट झाडी असलेला भाग लागला. शिवाय वालुबाई या वयाने तरुण होत्या. त्यामुळे जंगलातून प्रवास करणे हे एक संकटच होते. पण सुदैवाने त्यांची या ताणातून सुटका झाली. रेल्वेसाठी लागणारा कोळसा गाडीत भरण्यासाठी आणि उतरवण्यासाठी माणसांची गरज असलेला एक कंत्राटदार त्यांना भेटला. त्याच्यासाठी काही दिवस काम केल्यानंतर एके दिवशी साठे कुटुंबीय त्याला न सांगताच एका रेल्वेत बसले व मुंबईजवळ कल्याणला उतरले.

कल्याणला उतरल्यानंतर ते जॉन आणि मेरी या ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या चेल्यांच्या तावडीत सापडले. त्यांना या मिशनऱ्यांचा खूप त्रास झाला. त्यांच्या तावडीतून सुटणे अवघड होते, पण भाऊ साठे यांनी या पेचप्रसंगातून मार्ग काढला आणि साठे कुटुंबियांना पुन्हा आपले स्वातंत्र्य मिळाले.

## अण्णांचे मुंबईतील जीवन व कामगार-चळवळीतील सहभाग

साठे कुटुंबीय मुंबईच्या भायखळा या उपनगरात पोचले. भायखळ्यातील मशिदीच्या पश्चिमेला त्या काळी 'चांदबीबी चाळ' नांवाची एक प्रशस्त चाळ होती. त्या चाळीची मालकीण रसिक, श्रीमंत, प्रकृतीने निरोगी आणि मजबूत परंतु निपुत्रिक होती. काही प्रयत्नांनंतर साठे कुटुंबियांना या चाळीतील जिन्याखालची एक खोली रहाण्यासाठी मिळाली. तिथे ते एक-दोन वर्षे राहिले. त्या काळी मुंबईत अनेक घडामोडी होत होत्या. मुंबईच्या कामगार वस्त्यांमधील संप, बंद, मोर्चे यांचे चौदा-पंधरा वर्षे वयाच्या अण्णांवर काही नकारात्मक, तर काही सकारात्मक असे परिणाम झाले.

साठे कुटुंबियांची मुंबईतील जीवनाची सुरुवात अपेक्षेपेक्षा चांगली झाली. त्यांना पुरेसे खायला मिळत असे. अण्णा भाऊ कापडाच्या एका फिरत्या विक्रेत्यासाठी डोक्यावर जुन्या-नव्या कपड्यांची पेटी घेऊन त्या कपड्यांची जाहिरात व विक्री करीत फिरण्यासारखी छोटी-मोठी कामे करीत असत.

वैचारिकदृष्ट्या ही त्यांच्या घडणीची वर्षे होती. मुंबईत विविध ठिकाणी राष्ट्रीय, राजकीय, सामाजिकदृष्ट्या महत्त्वाच्या विषयांवर होणाऱ्या चर्चा ऐकण्यात त्यांना गोडी वाटू लागली. त्यांना मुंबईतील दोन गोष्टींनी आकर्षित केले. त्या म्हणजे: 1. विविध राजकीय संघटना, आणि 2. त्या काळचे मूक चित्रपट. ज्या तरुणांच्या संगतीत अण्णा भाऊ वाढत आणि घडत होते, ते विविध प्रश्नांवर रात्री उशीरापर्यंत चर्चा करीत असत.

एखाद्या व्यक्तीकडून एखाद्या विचारप्रणालीचा स्वीकार हा बहुधा त्या व्यक्तीची सामाजिक, आर्थिक व कौटुंबिक पार्श्वभूमी व त्या पार्श्वभूमीचे त्या व्यक्तीवरील परिणाम यांच्यावर अवलंबून असतो. उदाहरणार्थ, भुकेली माणसे कार्ल मार्क्सच्या विचारांकडे आकर्षित होतात. अण्णा भाऊंच्या बाबतीतही हेच घडले – तारुण्यात पदार्पण करण्यापूर्वीच ते मार्क्सच्या साम्यवादी विचारप्रणालीचे अनुचर व समर्थक बनले.

त्या काळात कम्युनिस्ट पार्टीच्या सभा आयोजित करणे, प्रचारपत्रके वाटणे, भिंतींवर घोषणा लिहिणे, संप आणि मोर्चांसाठी घोषणाफलक रंगवणे, पोस्टर्स रंगवणे व ती भिंतींवर चिकटवणे ही कामे कम्युनिस्ट पार्टीच्या तरुण विभागाकडून ('यूथ विंग' कडून) केली जात असत. अण्णा (तुकाराम) यांना या साऱ्या गोष्टी करणे आवडत होते. त्याचबरोबर त्यांच्या बौद्धिक पातळीतही बदल होत होते. कम्युनिस्ट पक्षाच्या कार्यक्रमांसाठी तसेच मित्रांच्या आणि कार्यकर्त्यांच्या करमणुकीसाठी त्यांनी गाणी, पोवाडे आणि कवने गायला सुरुवात केली.

त्यामुळे, बुद्धिमान असलेले तुकाराम साठे मुंबईतील कम्युनिस्ट विचारसरणीच्या तरुणांमध्ये वेगाने लोकप्रिय झाले. ते इतके लोकप्रिय झाले, की एखाद्या दिवशी ते ठरलेल्या वेळी ठरलेल्या ठिकाणी आले नाहीत, तर त्यांचे हे तरुण कॉम्रेड मित्र पळत-पळत त्यांच्या घराजवळ जात व त्यांना काही अंतरावरुन हाक मारीत. जाई आणि शंकर आपल्या वडील बंधूंना 'अण्णा' म्हणत. त्यामुळे, मित्र जेव्हा तुकाराम साठे यांची चौकशी करण्यासाठी येत, तेव्हा जाई सांगे, 'अण्णा घरी नाहीत.' सुरुवाती-सुरुवातीला तुकाराम साठेंच्या मित्रांना हे 'अण्णा' कोण ते समजत नसे. नंतर एकदा शंकरने स्पष्ट केले – 'आमचे भाऊ – तुकाराम – घरी नाहीत.' तेव्हा तुकारामच्या मित्रांना उमगले, की आपला स्नेही तुकाराम याला त्याचे बंधु-भगिनी घरी 'अण्णा' असे म्हणतात. तुकाराम साठे यांचे नागपूरचे एक हुशार स्नेही श्री. दिनकर यांना वाटले, की 'तुकाराम' पेक्षा 'अण्णा' हे घरगुती नावच अधिक चांगले आहे. त्यामुळे सगळ्या मित्रांनी त्यांना 'अण्णा' असेच संबोधायचे ठरवले. त्यानंतर त्यांचा प्रत्येक मित्र त्यांना 'अण्णा' अशीच हाक मारू लागला. अशा प्रकारे वाटेगावचे श्री. तुकाराम भाऊ साठे हे कायमचे श्री. अण्णा भाऊ साठे बनले.



## अण्णांमध्ये वर्गभेदाची जाणीव

हा कालखंड दुसरे महायुद्ध उंबरठ्यावर येऊन उभे राहिले, तेव्हाचा होता, आणि वेगवगळ्या विचारप्रणालींचे युद्ध भारतामध्ये चालू होते. अण्णा भाऊंचे मन ते सारे विचार आणि संस्कार कळत-नकळत ग्रहण करीत होते. एव्हाना त्यांनी आपल्या नात्यातल्या फिरत्या कपडेविक्रेत्याकडची नोकरी सोडून दिली होती. त्यानंतर त्यांनी हॉटेलमधील वेटर, हमाल, बूटपॉलिशवाला, सिनेमा-थिएटरमधील डोअरकीपर, खाणकामगार, पाणीपुरवठा विभागातील पाईप-फिटर अशी अनेक हलकी कामे केली. ही सगळी कामे त्यांचे अनुभवविश्व समृद्ध करीत होती.

सिनेमा पहाण्याच्या छंदाने ते साक्षर झाले. 'काळा पहाड', 'बासरीवाला', 'कनक-कांता' असे त्या काळचे जवळजवळ सर्व प्रसिद्ध चित्रपट त्यांनी पाहिले होते. दुकानांवरील पाट्या आणि सिनेमाची पोस्टर्स वाचण्याच्या सरावातूनही त्यांनी आपली साक्षरता जपली आणि वाढवली.

## आण्णा भाऊंचे निरीक्षण

स्वातंत्र्य जवळ आल्याचे त्या काळच्या दूरदर्शी राष्ट्रीय नेत्यांना दिसत होते. वेगवेगळ्या विचारप्रणालींचे राजकीय नेते आपापल्या विचारप्रणालीचा प्रसार करण्याचा प्रयत्न करीत होते. याचा परिणाम म्हणून सामाजिक संघर्ष अधिक तीव्र होऊ लागले. मुख्य संघर्ष हा निःसंशयपणे ब्रिटिश आणि भारतीय यांच्यामध्येच होता; पण त्याच वेळी अंतर्गत प्रादेशिकतावाद, वंशवाद, जातीपाती यांच्यामुळे भारतीयांमध्ये आपसातच अनेकदा दंगली उसळत. यांच्यापैकी काही दंगली ब्रिटिशांनीच गुप्तपणे पाठिंबा देऊन घडवून आणलेल्या असत. या जवळजवळ सगळ्याच संघर्षांची मुळे मुंबईत असत. त्या काळी मुंबईतील जीवन अस्थिर आणि विस्कळित करणारा सर्वात भयानक असुर म्हणजे हिंदू-मुस्लिम दंगली. या दंगलींमध्ये हिंदू आणि मुस्लिम अशा दोन्ही समाजांतल्या, ज्यांनी काहीही गुन्हा केलेला नाही अशा निष्पाप लोकांचेच बळी घेतले जात. या दंगलींमुळे साठे

कुटुंबियांनाही खूप त्रास होत असे.

या कालखंडात अण्णा भाऊ झाडण्या व झाडू तयार करून विकीत. चेंबूर आणि पारसी ऑक्ट्रॉय पोस्ट या ठिकाणी काही काळ राहून ते माटुंगा लेबर कॅम्प येथे रहायला आले. ते आपल्या यानंतरच्या आयुष्यातील बराच काळ चेंबूर आणि माटुंगा याच भागामध्ये राहिले. आपल्या लेखनापैकी बरेचसे लेखन इथेच केले.

माटुंगा लेबर कॅम्पमध्ये रहायला आल्यानंतर साठे कुटुंबियांच्या आयुष्याला बऱ्यापैकी स्थैर्य आले. अण्णा आणि भागूबाई ही मुले आता वयात आली होती, पण दंगलीमध्ये घडलेल्या दोन धक्कादायक प्रसंगांमुळे भाऊ साठे सतत नैराश्यात असत. वालुबाईंची अवस्थाही जवळपास तशीच होती. आई-वडिलांच्या अशा अवस्थेमुळे अण्णांना अगदी सतरा-अठरा वर्षांच्या कोवळ्या वयातच सगळी जबाबदारी - विशेषतः आर्थिक जबाबदारी - आपल्या खांद्यावर घ्यावी लागली.

याच काळात त्यांनी नायगाव मिल, कोहिनूर मिल या कापडगिरण्यांत कामगार म्हणून काम करायला सुरुवात केली. मिलच्या नोकऱ्यांमध्ये असुरक्षिततेची तलवार सतत डोक्यावर टांगलेली असे. उदाहरणार्थ, कोहिनूर मिलमधील त्यांची नोकरी फक्त चारच महिन्यांत संपुष्टात आली. सगळ्या कुटुंबियांना हा एक मोठाच धक्का होता. काय करावे हे त्यांना कळेना. असहाय होऊन त्यांनी मुंबई सोडून वाटेगावला प्रयाण केले.

साठे कुटुंबीय आपल्या मूळ गावी परत आले खरे, पण उपजीविकेचा प्रश्न अद्यापही आ वासून त्यांच्यापुढे उभा होता - किंबहुना तो अधिकच गंभीर झाला होता. उलट वाटेगावपेक्षा मुंबई खूपच बरी होती, कारण तिथे त्यांच्यापैकी काहींना काही-ना-काही काम मिळत असे. यात भर म्हणजे भाऊ साठे हे खूपच आजारी होते. कुटुंबातील मुले शेतमजूर म्हणून काम करीत, पण अण्णा भाऊंना मात्र इथे घरच्यासारखे वाटत नव्हते.

## अण्णा भाऊ : एक कलाकार

त्या काळी महाराष्ट्रात तमासगीर असत. अण्णा भाऊंच्या काही नातेवाईकांच्या मालकीच्या तमाशापार्ट्या होत्या आणि ग्रामीण भागांत ते तमाशाचे खेळ करीत. लोकनाट्यामध्ये स्वतःचे नाट्यगुण दाखवायला मोठा वाव असल्याने आणि अण्णा भाऊंच्या अंगी तमाशासाठी आवश्यक असे गुण असल्याने, त्यांनी बापू साठे



या आपल्या नात्यातील एका व्यक्तीच्या मालकीच्या तमाशापार्टीमध्ये काम करायला सुरुवात केली. महाराष्ट्रातील मांग समाजाने तमाशाकलेला मोठे योगदान दिले आहे. अण्णा भाऊ हे त्याच परंपरेचे एक प्रतिनिधी व पाईक होते.

त्यांच्या अंगी काही जन्मजात गुण होते. त्यांना एखाद्या भूमिकेचे ताबडतोब, अचूक आणि सखोल आकलन होत असे. परिणामकारक आणि विनोदी संवाद ते अगदी कमी वेळात तयार करू शकत असत किंवा लिहू शकत असत. याशिवाय त्यांचे संवाद तर्कसंगत आणि ओघवते असत. पाठांतर करणे त्यांना उत्तम जमत असे. त्यांचा आवाजही चांगला होता. तमाशात भूमिका करणे व गाणी गाणे यांच्याव्यतिरिक्त ते हार्मोनियम, तबला, सारंगी, ढोलकी, बुलबुलतरंग ही आणि इतर वाद्ये वाजवण्यातही तरबेज होते. तलवार, विटा, दांडपट्टा, कुऱ्हाड ही शस्त्रे हाताळण्यात तर ते आधीच कुशल होते. अशा गुणसंपन्न व्यक्तिमत्त्वामुळे तमाशाच्या क्षेत्रात त्यांचे स्वागतच झाले. त्यांनीही आपल्या गुणांचा उपयोग तमाशातील पात्रे साकार करण्यासाठी केला. तमाशाच्या प्रयोगांमध्ये भाग घेतल्याने ते आपल्या अंगचे गुण आणखी वाढवू शकले.

अण्णा भाऊंनी नंतर तमाशाकलेला 'लोकनाट्या'त रूपांतरित करून नवजीवन दिले. तमाशाकलेला लोकप्रियता, आदर, परिणामकारकता आणि समृद्धी मिळण्यामध्ये महत्त्वाचे योगदान दिले, ते अण्णा भाऊंनीच. त्यांच्या राजकीय विषयांवरील वगनाट्यांनी नंतर जनतेमध्ये भारतीय आणि विशेषतः महाराष्ट्रातील राजकीय परिस्थितीबद्दल जागृती वाढवण्याचे काम केले. संयुक्त महाराष्ट्र चळवळ, बेळगाव-कारवार सीमा वाद आणि गोवा मुक्ति आंदोलन या आंदोलनांमध्ये हिरीरीने भाग घेणाऱ्या 'समिती'च्या स्थापनेपूर्वी आणि स्थापनेनंतर अण्णा भाऊंनी सामान्यजनांना आपल्याभोवतीच्या राजकीय घडामोडींबद्दल जागरूक करण्याचे मोठे कार्य केले. ते कम्युनिस्ट पक्षाचे कार्ड-होल्डर व सक्रिय कार्यकर्ते होते; पण खरे पहाता त्यांची खरी बांधिलकी सामान्य लोकांशी होती. 'लाल बावटा कलापथका'च्या माध्यमातून शाहीर अण्णा भाऊ साठे, शाहीर अमर शेख व शाहीर द. ना. गव्हाणकर या त्रिमूर्तींने लोकांना आपल्याभोवतीच्या आर्थिक, राजकीय आणि सामाजिक वास्तवाबद्दल सचेतन केले.

याच सुमाराला अण्णा भाऊंना एक भावनिक धक्का बसला. त्यांचे वडील श्री. भाऊ साठे यांचे निधन झाले. वडिलांचे निधन झाल्यावर थोड्याच काळानंतर अण्णा भाऊंनी कालगाव (ता. पाटण, जिल्हा सातारा) येथील कोंडूबाई नांवाच्या एका अशिक्षित मुलीशी लग्न केले. लग्नानंतर ते पूर्वीप्रमाणे उन्मुक्त राहिले नाहीत.

संपूर्ण कुटुंबाची जबाबदारी आता त्यांच्या खांद्यावर पडली. खरे तर पारंपरिक पद्धतीने संसार करणे त्यांच्या स्वभावात नव्हते. एक स्वतंत्र आणि साहसी कलाकार एखाद्या जिप्सीप्रमाणे त्यांच्यामध्ये लपलेला होता.

1942 मध्ये त्यांना एक मुलगा झाला. त्याचे नांव मधुकर ठेवण्यात आले. मधुकर साठे अद्याप वाटेगाव या आपल्या मूळ गावी रहात आहेत. मुलाच्या जन्मामुळे कौटुंबिक जीवनात थोडे समाधान असले, तरी अण्णा भाऊंचे मुक्त वागणे आणि कुटुंबियांकडून – विशेषतः पत्नीकडून – त्यांच्याबद्दलच्या अपेक्षा यांचा मेळ बसत नव्हता. त्यांच्यामधील कलाकाराला ओळखण्याची आणि त्याचे कौतुक करण्याची क्षमता जणू त्यांच्या कुटुंबात कुणामध्येच नव्हती.

## अण्णा व 'भारत छोडो' चळवळ

त्या काळात भारतात सर्वत्र लोक स्वातंत्र्य मिळवण्याच्या इच्छेने झपाटलेले होते. महात्मा गांधींनी ब्रिटिशांना 'चले जाव!' असा आदेश दिला होता. त्यामुळे ब्रिटिशांनी नागरिकांना अटक करणे, उपद्रव देणे आणि अमानुष अत्याचार करणे सुरू केले होते. ब्रिटिशांच्या अशा कारवाया चालू असतानाही त्यांचे सरकार कमकुवत करण्याचे भारतीयांचे प्रयत्न चालूच होते. सातारा जिल्हा या कामगिरीत आघाडीवर होता. वाटेगाव भागात अनेक तरुणांनी बर्डे गुरूजींच्या नेतृत्वाखाली टेलिफोन लाइन्स कापून टाकल्या होत्या. अनेक घडामोडी होत होत्या. त्यांच्यापैकी काहीमध्ये अण्णा भाऊ भाग घेत होते. त्यामुळे त्यांच्यावर अटक-वॉरंट काढण्यात आले होते. या घटनेने त्यांना आपले घर कायमचे सोडण्यास भाग पाडले. अटक टाळण्यासाठी ते काही दिवस डोंगरदऱ्यांत लपून राहिले व पुन्हा एकदा मुंबईला आले. परंतु या वेळी त्यांचे ध्येय निश्चित झालेले होते. त्यांना आकर्षित करणाऱ्या राजकीय विचारसरणीचा एक धागा मिळाला होता. त्यामुळे ते कम्युनिस्ट पक्षाचे पूर्णवेळ प्रचारक बनले.

या काळात त्यांनी पक्षाचा प्रचार करण्यासाठी जिद्दीने सतत, अगदी चोवीस तास काम केले. या काळात पक्षाच्या कामाव्यतिरिक्त इतर कुठलाही विचार त्यांच्या मनात नसे. याच काळात कम्युनिस्ट पक्षाचा प्रचार करण्यासाठी एक कलापथक सुरू करण्याचा विचार सर्वश्री अण्णा भाऊ, अमर शेख व द. ना. गव्हाणकर यांच्या मनात आला. त्याची परिणती 1944 मध्ये 'लाल बावटा कलापथक' स्थापन करण्यात झाली.



कलापथक स्थापन करण्याच्या तीन ते चार वर्षे आधीपासून अण्णा भाऊ लेखन करण्याचा प्रयत्न करीत होते. आपणसुद्धा लेखक व कवी होऊ शकतो असा आत्मविश्वास त्यांना उपजतपणेच वाटत होता. त्यामुळे त्यांनी स्वतःच पोवाडे आणि प्रशस्तीपर गीते लिहून ती गाण्यास सुरुवात केली. त्यांचा 'स्तालिनग्राडचा पोवाडा' कामगारांमध्ये खूप लोकप्रिय होता. अण्णा भाऊंनी अशी एखादी काव्यरचना लिहावी आणि शाहीर अमर शेख यांनी ती आपल्या परिणामकारक, बुलंद आवाजात गावी असा जणू पायंडाच पडला होता.

## अण्णा भाऊ : एक शाहीर

कलापथकाच्या माध्यमातून स्वतःला व्यक्त करण्याची संधी मिळाल्याने अण्णा भाऊ यांच्यामधील कलाकार लोकांपुढे आला. त्यांच्यामधील कलाकाराला शिस्त लागली, समाधान मिळाले आणि प्रसिद्धीही लाभली. याच काळात त्यांनी छोटी-छोटी लोकनाट्ये लिहायला सुरुवात केली. अशी एकूण पंधरा लोकनाट्ये त्यांनी लिहिली. नंतरच्या काळात त्यांनी जे समर्थ लेखन केले, त्याची सुरुवातीचे हे पोवाडे व नाट्यलेखन ही म्हणजे जणू रंगीत तालीमच होती. या लेखनामुळेच महाराष्ट्रातील कम्युनिस्ट वर्तुळांमध्ये ते 'शाहीर अण्णा भाऊ साठे' म्हणून ओळखले जाऊ लागले.

पक्षाच्या कामासाठी ते वेगवेगळ्या गावांना भेटी देत असल्यामुळे त्यांच्या नवनवीन लोकांशी ओळखी होत होत्या. 1943-44 मध्ये त्यांना पक्षकार्यासाठी पुणे येथे रहावे लागले. तेथे त्यांची जयवंताबाई नांवाच्या एका तरुण विवाहित महिलेशी ओळख झाली. जयवंताबाईंना शांता आणि शकुंतला अशा दोन कन्या होत्या, पण काही कारणांमुळे त्या आपल्या पतीच्या घरी न रहाता पुण्यात आपल्या एका वृद्ध काकांच्या घरी रहात होत्या. हे काकासुद्धा कम्युनिस्ट पक्षाचे कार्य करीत असत. आपल्या पुतणीनेही पक्षकार्यात भाग घ्यावा असे त्यांना वाटत होते. त्यामुळे जयवंताबाई कम्युनिस्ट पक्षाच्या महिला आघाडीत काम करीत होत्या. त्या अण्णा भाऊंचे कार्य जवळून पहात होत्या व त्याबद्दल त्यांना खूप आदर वाटत होता. त्यामुळे त्यांना अण्णा भाऊंबद्दल आकर्षण वाटू लागले होते. त्यांच्या मुलींनाही अण्णा भाऊ आवडत होते. दरम्यान जयवंताबाईंच्या काकांचे निधन झाले व 1945 साली त्या अण्णा भाऊ यांच्याबरोबर मुंबईला आल्या. ते एकत्र राहू लागले व नंतर त्यांनी नोंदणी पद्धतीने विवाह केला.

अण्णा भाऊंच्या आयुष्यातील जयवंताबाईंच्या प्रवेशाने अण्णा भाऊंमध्ये अंतर्बाह्य बदल घडवून आणला. या घटनेमुळे त्यांच्या भटक्या जीवनाला वेसण बसली. ते स्थिर झाले. अण्णा भाऊंमधल्या कलाकाराला उत्तेजन देण्यासाठी, त्याचा विकास होण्यासाठी जयवंताबाईंनी व त्यांच्या कन्यांनी सर्वतोपरी प्रयत्न केले. 1945 पासून तर जोवर जयवंताबाई अण्णा भाऊंबरोबर होत्या, तोपर्यंत त्यांनी अण्णा भाऊंना शारीरिक कष्टाचे कुठलेही काम करू दिले नाही. उलट त्यांनीच कुटुंबासाठी अर्थार्जन करण्याच्या हेतून परिचारिका, भाजी-विक्रेती अशी कामे केली. त्यांच्या कन्यांनीही मिळतील ती कामे केली आणि अण्णा भाऊंची प्रतिभा फुलवण्यासाठी मदत केली.

तुलनेने स्थिरता व अनुकूलता लाभलेल्या याच कालखंडात अण्णा भाऊंनी आपल्या महत्त्वाच्या साहित्यकृती लिहिण्याची थोर कामगिरी पार पाडली.

## अखेर

जयवंताबाई व अण्णा भाऊ यांच्यामधील परस्परांना समाधानी करणाऱ्या नात्याची शोकांतिका झाली. शेवटी या दोघांमध्ये भरून न काढता येण्याजोगी अशी दरी निर्माण झाली, की जयवंताबाई पुन्हा कधीही परत न येण्यासाठी अण्णा भाऊंना सोडून आपल्या कन्येकडे रहाण्यासाठी निघून गेल्या. याच घटनेचा अण्णा भाऊंना खूप धक्का बसला असावा असे मानले जाते. त्यामुळे त्यांचे मद्यपान प्रमाणाबाहेर वाढले व त्यामुळेच बहुधा त्यांचा लवकर मृत्यू झाला.

प्रतिभावंत अण्णा भाऊंचे गरिबीने गांजलेल्या, आजारी व निराश अवस्थेत 18 जुलै 1969 रोजी निधन झाले.



# 2

# कादंबऱ्या

अण्णा भाऊंनी ज्या कालखंडात कादंबरीलेखनास सुरुवात केली, त्या कालखंडावर प्रख्यात मराठी कादंबरीकार श्री. ना. सी. फडके व श्री. वि. स. खांडेकर यांचा प्रभाव होता. त्या काळात मराठी साहित्य आणि समीक्षाक्षेत्रात साहित्याच्या प्रयोजनाबद्दल विवाद चालू होता. 'कलेसाठी कला की जीवनासाठी कला?' हा या विवादाचा विषय होता. ना. सी. फडके 'कलेसाठी कला' या मताचे समर्थक होते, तर वि. स. खांडेकर 'जीवनासाठी कला' या मताचे समर्थक होते. त्याच काळात श्री. ह. ना. आपटे सामाजिक समस्यांवर आधारित कादंबऱ्या लिहीत होते.

त्या काळपर्यंत मराठी कादंबरी मुख्यत्त्वेकरून उच्चवर्गीय, मध्यमवर्गीय व नागरी जीवनाचे चित्रण करण्यातच रमली होती. थोडक्यात सांगायचे, तर सामान्य माणसाच्या जीवनाचे चित्रण तोवर मराठी कादंबरीत आलेले नव्हते. दुसरे म्हणजे, त्या काळातील बहुतेक मराठी कादंबरीकार उच्चभ्रू वर्गातील होते. त्यामुळे, त्यांच्यापैकी एखाद्याने जरी सामान्य माणसाच्या जीवनाचे चित्रण करण्याचा प्रयत्न केला, तरी त्याचा अनुभव हा उसना असे, व त्यामुळेच प्रत्ययकारी नसे.

फडके-खांडेकरांच्या युगानंतर मराठी कादंबरी मुळापासून आणि वेगाने बदलू लागली. आता तिच्यामध्ये ग्रामीण भागातील, झोपडपट्ट्यांतील, महाराष्ट्रातील एखाद्या विशिष्ट भागातील; तसेच दीनदलित, शोषित, आदिवासी व गुन्हेगार स्तरातील लोकांच्या जीवनाचे चित्रण होऊ लागले. मराठी कादंबरीचा केंद्रबिंदू शहरी उच्चमध्यमवर्ग आणि मध्यमवर्ग यांच्याकडून आजवर कादंबरीत चित्रित न झालेल्या ग्रामीण भागातील निम्नवर्गाकडे सरकू लागला. कादंबरीकार म्हणून अण्णा भाऊ या वर्गाशी संबंधित होते. त्यांच्या काळी संज्ञाप्रवाहात्मक व त्याच प्रकारच्या

इतर तंत्रांमध्ये कादंबऱ्या लिहिल्या जात होत्या; पण अशा प्रकारच्या कादंबऱ्यांची त्यांनी दखल घेतलेली दिसत नाही.

अण्णा भाऊंनी एकंदर चाळीस कादंबऱ्या लिहिल्या असे नोंदींवरून सांगितले जाते; पण काळजीपूर्वक पडताळा घेता असे दिसते, की त्यांनी सुमारे तीस कादंबऱ्या लिहिल्या. मराठीतील काही अभ्यासकांच्या मते अण्णा भाऊंच्या कादंबऱ्यांचे चार प्रकारांमध्ये वर्गीकरण करता येते. पण असे वर्गीकरण हे केवळ कामचलाऊ असते; कारण एकच कादंबरी एकापेक्षा अधिक प्रकारांमध्येही मोडू शकते असे मला वाटते. असे असले, तरी खालील वर्गीकरण त्यांच्या कादंबऱ्या समजून घेण्यात काही प्रमाणात उपयोगी ठरते:

1. साहसाचे चित्रण करणाऱ्या कादंबऱ्या.
2. महिलांच्या समस्यांचे चित्रण करणाऱ्या कादंबऱ्या.
3. प्रेमाचे चित्रण करणाऱ्या कादंबऱ्या.
4. ग्रामीण जीवनाचे चित्रण करणाऱ्या कादंबऱ्या.

## 1. साहसाचे चित्रण करणाऱ्या कादंबऱ्या

सर्वसाधारणपणे या प्रकारात येणाऱ्या कादंबऱ्या म्हणजे 'वारणेच्या खोऱ्यात' (1951) – याच कादंबरीला 'मंगला' असेही शीर्षक आहे; 'फकिरा' (1959), 'वारणेचा वाघ', 'मास्तर' – याच कादंबरीला 'धुंद' असेही शीर्षक आहे; आणि 'अग्निदिव्य'.

अण्णा भाऊ हे हाडाचे शाहीर होते. शाहीर हा मानवी जीवनातील सर्व उदात्त आणि भव्य तत्त्वांचा पूजक असतो, आणि त्यामुळेच तो पोवाडे आणि लावण्या लिहितो. शाहिराच्या या वैशिष्ट्यांबरोबरच, कादंबरीकार म्हणून आपल्या कारकीर्दीच्या सुरुवातीला अण्णा भाऊंनी साहसाचे गुणगान आणि पूजन करणाऱ्या कादंबऱ्या लिहिल्या. त्यांच्या वर उल्लेख केलेल्या सर्व कादंबऱ्या या-ना-त्या प्रकारे साहसकथा आहेत.

'वारणेच्या खोऱ्यात' या कादंबरीत अण्णा भाऊंनी 1942 च्या 'भारत छोडो' आंदोलनात हौतात्म्य पत्करणारा तरुण स्वातंत्र्यसैनिक हिंदुराव उर्फ राजाराम पांडुरंग पाटील जावळेकर आणि त्याची प्रेयसी मंगला यांच्या शोकांतिकेची कथा सांगितली आहे. या कादंबरीत 'भारत छोडो' आंदोलनाने तयार केलेले वातावरण, या आंदोलनात सहभागी झालेल्या सांगली जिल्ह्यातील वारणेच्या खोऱ्यातील



स्वातंत्र्यसैनिकांची साहसकृत्ये यांचे, व विशेषतः हिंदुराव याला त्याची प्रेयसी मंगला हिने केलेल्या मदतीचे चित्रण करण्यात आले आहे. मंगला ही व्यक्तिरेखा या कादंबरीत केंद्रस्थानी व महत्त्वाची असल्यानेच बहुधा ही कादंबरी नंतर 'मंगला' या नांवाने प्रकाशित करण्यात आली.

'फकिरा' ही अण्णा भाऊंची सर्वात प्रसिद्ध कादंबरी. तिचे कौतुक अगदी ज्ञानपीठ पुरस्कार विजेत्या वि. स. खांडेकर यांनीही केले. 1961 साली तिला उत्कृष्ट कादंबरीबद्दलचा महाराष्ट्र राज्य साहित्य पुरस्कार मिळाला. या कादंबरीत अण्णा भाऊंनी शतकानुशतके उपेक्षित राहिलेल्या मांग समाजाच्या सामर्थ्याचे आणि धाडसाचे चित्रण केले आहे. अर्थात्, अण्णा भाऊ यांच्यापूर्वी श्री. म. माटे यांनी आपल्या 'उपेक्षितांचे अंतरंग' (1941) या पुस्तकातील 'तराळखोऱ्यातील पिऱ्या' या व्यक्तिचित्रात उपेक्षिताचे जीवन दाखवण्याचा प्रयत्न केला होता; परंतु तो फार त्रोटक स्वरूपाचा होता. अण्णा भाऊंनी हे कार्य सविस्तरपणे केले. त्यांनी जितक्या मोठ्या प्रमाणात हे काम केले, तितक्या प्रमाणात हे काम त्यांच्यापूर्वी कुणी केले नव्हते. 'फकिरा' या कादंबरीत त्यांनी दलितांच्या अंगी असलेल्या झुंजारपणा, बंडखोरपणा, लढताना मरण पत्करण्याची तयारी, स्वाभिमान, गरजू आणि लायक व्यक्तींना कुठल्याही परिस्थितीत मदत करण्याची वृत्ती या उदात्त गुणांचे चित्रण केले आहे.

'फकिरा' या कादंबरीची कथा ही अण्णा भाऊंचे खऱ्या आयुष्यातील मामा श्री. फकिरा राणोजी मांग यांची जीवनकथा आहे. दुष्काळ, ताप, रोगांच्या साथी आणि उपासमार यांच्यामुळे दलित वर्गातील लोक मरू लागले होते. फकिरा यांच्या खेड्यातील विष्णुपंत कुलकर्णी यांनी दलितांना 'काहीही करा पण जगा' असा सल्ला देतात. त्यांचा सल्ला आणि आपली दृढता यांच्या बळावर फकिरा धान्याची गोदामे आणि ब्रिटिशांचे व त्यांच्या साथीदारांचे खजिने लुटतात आणि दलित, गरीब आणि गरजू लोकांमध्ये त्यांचे वाटप करतात. त्यामुळे 'फकिरा' या कादंबरीला मराठीतील 'रॉबिनहुड कथा' म्हणायला हरकत नसावी. फकिरा यांच्या या कृत्यांमुळे ब्रिटिश सरकारचा, जन्माने भारतीय असलेला पोलिस अधिकारी बाबरखान फकिरा यांना अटक करण्याचा प्रयत्न करतो; पण फकिरा फरारी होतात, जंगलात आश्रय घेतात आणि त्यांना अटक करण्याचे बाबरखानचे प्रयत्न हाणून पाडतात. परंतु त्यांच्या नातेवाईकांना ब्रिटिश सरकार ओलीस ठेवते व त्यांचा छळ करते. फकिरा शरण येतात. नंतर ब्रिटिश सरकार त्यांना फाशी देते. ते मरतात, पण आपल्यामागे एक अमर अशी प्रेरणादायक कहाणी ठेवून जातात – हीच आहे वि. स.

खांडेकरांसारख्या जाणत्यांनी गौरवलेल्या 'फकिरा' कादंबरीची कथा.

असे असले, तरी आजचे प्रख्यात मराठी कादंबरीकार व समीक्षक प्रा. भालचंद्र नेमाडे यांच्या मते 'फकिरा' ही रसिकमान्यता मिळालेली कादंबरी पूर्णपणे निर्दोष अशी नाही. 'फकिरा'तील वैगुण्यांवर आपले मत व्यक्त करताना प्रा. नेमाडे लिहितात, "अण्णा भाऊ साठे यांची 'फकिरा' ही कादंबरी वास्तवतेचे आशयद्रव्य असूनही रीतिप्रधान होते. खरे तर एका पोटसमूहाची संस्कृती मांडणारी म्हणून 'फकिरा' ही 'बनगरवाडी' सारखीच क्रांतिकारक ठरते, पण 'सृष्टीच्या गालांवर स्मित तरळलं', 'निर्भयता अवतीर्ण झाली', 'राधाचा आनंद गगनात मावेनासा झाला' अशा निवेदनांतून ही कादंबरी ठोकळेबाज संघर्षातच अडकून आकृतिनिष्ठच रहाते... लेखक या संघर्षात सहभागी न होता तटस्थ निरीक्षक राहिल्याने नैतिक प्रश्न टाळलेले असतात, हे ही आकृतीची रीतिनिष्ठ पकड न सुटल्याने घडते... पिढीजात चोऱ्या करणाऱ्या महारामांगांनी धान्य लुटावे हे अपरिहार्य आहे; तसेच समाजात कायदा-सुव्यवस्था वगैरेसाठी त्यांना पकडून डांबावे की नाही असे नैतिक प्रश्न टाळलेले दिसतात.' [1]

'मास्तर' या कादंबरीत संपूर्ण श्रद्धेने व त्यागी वृत्तीने स्वातंत्र्यलढ्यात उडी घेणाऱ्या देवगावच्या एका बंडखोर शिक्षकाचे जीवन अण्णा भाऊंनी चित्रित केले आहे. स्वातंत्र्य मिळवण्यासाठी शस्त्रांचा वापर करण्यावर मास्तरांचा विश्वास असतो. ते सातारा जिल्ह्यातील तळागाळातल्या लोकांना स्वातंत्र्यलढ्यात भाग घेण्यासाठी प्रवृत्त करतात. मास्तरांना आपल्या कुटुंबासाठीही वेळ कसा नसतो, त्यामुळे त्यांच्या पहिल्या पत्नीचे निधन कसे होते, आपण तुरुंगातून सुटण्याची शक्यता कमी असल्याचे जाणवल्याने कशा प्रकारे ते मालन या आपल्या दुसऱ्या पत्नीला दुसऱ्या कुणाशी लग्न करण्याचा सल्ला देतात, कशा प्रकारे तिचे दुसरे लग्न झाल्यानंतर तेराच दिवसांनी त्यांची सुटका होते व ते तिला कायमचे पारखे होतात हे अण्णा भाऊंनी या कादंबरीत दाखवले आहे.

'वारणेचा वाघ' या कादंबरीत अण्णा भाऊंनी पिळवणूक करणारे देशी सावकार-जमीनदार व परकीय (ब्रिटिश) राज्यकर्ते यांच्याविरुद्ध लढणाऱ्या नायकाचे चित्रण केले आहे. ही कादंबरी सांगली जिल्ह्यातील कुमज खेड्यातल्या सतू भोसले याची कथा आहे. ब्रिटिशांचा अरेरावीपणा, दडपशाही आणि इतरांवर गुलामगिरी

1 : नेमाडे, भालचंद्र : '1950 ते 1975 या कालखंडातील मराठी कादंबरी - प्रेरणा व स्वरूप', 'अनुष्टुभ्', सप्टेंबर-ऑक्टोबर 1980, पृष्ठे 54-55.



लादण्याची वृत्ती यांच्याविरुद्ध बंड करणाऱ्या सतू भोसले या वाघासारख्या माणसाची ही शोकान्त कथा आहे. या कादंबरीत अण्णा भाऊंनी साहस, स्वाभिमान, प्रामाणिकपणा, आत्मविश्वास, दृढता आणि स्वातंत्र्य मिळवण्याची अदम्य इच्छा या भारतीय तसेच वैश्विक मूल्यांची पूजा बांधली आहे.

'अग्निदिव्य' ही छत्रपती शिवाजी महाराजांचे सरसेनापती प्रतापराव गुजर यांच्या उदात्त जीवनाचे आणि पराक्रमाचे चित्रण करणारी ऐतिहासिक कादंबरी आहे. शिवाजीराजांचा शत्रू विजापूरचा आदिलशहा याचा सेनापती बहेलोखान याच्याशी प्रतापरावांनी कशी झुंज देऊन त्याला पराभूत केले, त्याचे चित्रण 'अग्निदिव्य' या कादंबरीत अण्णा भाऊंनी केले आहे. पळून चाललेल्या बहेलोखानाला मारण्याच्या प्रयत्नात प्रतापराव कशा प्रकारे हौतात्म्य पत्करतात याचेही वर्णन प्रस्तुत कादंबरीत येते.

साहसाचे चित्रण करणाऱ्या वर उल्लेख केलेल्या सहा कादंबऱ्यांवरून दिसून येते, की महाराष्ट्रीय, आणि एकंदरच भारतीय बंडखोरांचे आणि त्यांच्या पराक्रमांचे साहित्यातून पूजन करणे हा अण्णा भाऊंचा एक सर्वात आवडता विषय होता. हौतात्म्य पत्करणे हा त्या वीरांचा एक महत्त्वाचा गुण होता.

## 2. महिलांच्या समस्यांवरील कादंबऱ्या

अण्णा भाऊंच्या कादंबऱ्यांचा गुणात्मक दृष्ट्या विचार करता, साहसाचे चित्रण करणाऱ्या कादंबऱ्यांखालोखाल महिलांच्या समस्यांवरील कादंबऱ्यांचा क्रम लागतो. या कादंबऱ्यांपैकी महत्त्वाच्या कादंबऱ्या म्हणजे 'चित्रा' (1951), 'वैजयंता', 'चंदन', 'चिखलातील कमळ', 'फुलपाखरू', 'टिळा लावते मी रक्ताचा' (हीच कादंबरी 'आवडी' या शीर्षकानेही प्रकाशित झाली आहे), आणि 'रत्ना.'

'चित्रा' या कादंबरीचे शीर्षक कादंबरीतील मध्यवर्ती व्यक्तिरेखा 'चित्रा' हिच्यावरून देण्यात आले आहे. या कादंबरीच्या प्रस्तावनेत अण्णा भाऊंनी लिहिले आहे, की जरी ही कादंबरी काही वाचकांना अवास्तव वाटण्याची शक्यता असली, तरी ही एक सत्य कथा आहे. ही कादंबरी एक प्रकारे 1945-46 च्या मुंबईसारख्या शहरांच्या औद्योगीकरणाचे दोष व त्यांचे लोकांच्या लैंगिक नीतिमत्तेवर होणारे परिणाम दाखवते. औद्योगीकरणाच्या वाढीबरोबरच शरीरविक्रयाचा व्यवसायही कसा वाढला आणि कशा प्रकारे हजारो निष्पाप स्त्रियांना दलालांकडून बळी बनवण्यात आले, याचे चित्रण ही कादंबरी करते. पैशाच्या आकर्षणामुळे काही अगदी जवळचे

नातेवाईकही आपल्या नात्यातील महिलांना या व्यवसायात जाण्यास भाग पाडीत होते. चित्राची कथा अशाच अभागिनींपैकी एकीची कथा आहे.

तमाशा कलावंतांना ज्या समस्यांना तोंड द्यावे लागते, त्या समस्या 'वैजयंता' या कादंबरीत स्पष्टपणे चित्रित करण्यात आल्या आहेत. 'वैजयंता' ही तमाशा कलावंतांच्या समस्यांवरील मराठीतील पहिली कादंबरी आहे हे आता सर्वमान्य झाले आहे. तमाशातील महिला कलावंतांचे कशा प्रकारे लैंगिक, सामाजिक, आर्थिक आणि भावनिक शोषण केले जाते आणि कशा प्रकारे बऱ्याचशा कलावती या व्यवसायात केवळ नाइलाजामुळे येतात याचे चित्रण 'वैजयंता' मध्ये करण्यात आले आहे.

'चंदन' या कादंबरीमध्ये अण्णा भाऊंनी मुंबईतील एका झोपडपट्टीत रहाणाऱ्या 'चंदन' नावाच्या एका कामकरी स्त्रीचे साहस चित्रित केले आहे. चंदनच्या पतीच्या मृत्यूनंतर, तिच्यावर अत्याचार करण्यासाठी टपलेल्या काही दुष्ट प्रवृत्तीच्या लोकांविरुद्ध तिने आपल्या शीलरक्षणासाठी दिलेला लढा या कादंबरीत दाखवला आहे. मराठी साहित्यात कामकरी स्त्रीचे असे चित्रण बहुधा प्रथमच 'चंदन' मध्ये करण्यात आले आहे.

'फुलपाखरू' ही सुधारगृहातील मुलांची आणि त्यांच्या गुन्हेगारी जीवनाची कथा आहे. दिलीप आणि ग्यान ही सुधारगृहातील दोन मुले रोहिणी या एका गावाकडील मुलीला सोनेरी भविष्याचे, नोकरीचे आणि पैशांचे आमिष दाखवून, फसवून मुंबीला आणतात. प्रत्यक्ष मुंबईला आल्यावर मात्र तिला वेश्याव्यवसाय करण्यास भाग पाडतात. ही रोहिणी म्हणजेच कादंबरीच्या शीर्षकातील 'फुलपाखरू'. दिलीप नांवाचा एक दलाल जॅक नांवाच्या एका 'गिऱ्हाइका'जवळ तिचे वर्णन 'फुलपाखरू' असे करतो. रोहिणीला या किळसवाण्या जीवनाचा कंटाळा आलेला असतो, आणि त्यातून मुक्त व्हायचे असते. सुदैवाने रोहिणीच्या झोपडपट्टीत तिच्या झोपडीसमोरील झोपडीत रहाणारा राजा हा तरुण, ती वेश्या असल्याचे ठाऊक असूनही तिच्याशी लग्न करायची तयारी दाखवतो, व तिला दिलीप आणि ग्यान या समाजकंटाकांनी वेश्याव्यवसायाच्या ज्या नरकात ढकललेले असते, त्यातून तिची सुटका करतो.

महाराष्ट्रातील पाली, जेजुरी आणि कर्नाटकातील सौंदत्ती या गावांमध्ये मुलगी खंडोबा या दैवताला अर्पण करण्याच्या धार्मिक प्रथेचे दुष्परिणाम आणि अन्याय यांचे चित्रण अण्णा भाऊंनी 'चिखलातील कमळ' या कादंबरीत केले आहे. या मुली खंडोबाला संतुष्ट करण्यासाठी त्याला 'वाहिल्या' जातात आणि त्यांचे



खंडोबाशी लग्न झाले आहे असे समजले जाते. अशा मुलीला 'मुरळी' म्हणून ओळखले जाते. प्रत्यक्षात मात्र त्या धर्माच्या नांवाखाली शरीरविक्रय करणाऱ्या वेश्याच असतात. त्यांच्याप्रमाणेच खंडोबाला अर्पण केलेल्या पुरुषांशी – 'वाघ्यां'शी – त्यांचे शरीरसंबंध असतात. वाघ्या आणि मुरळ्या खंडोबाची स्तवने गातात आणि नृत्य करतात. मुरळ्यांना कुठलीही सुरक्षितता नसल्याने पुरुष त्यांच्याशी गैरवर्तन करतात. अखेर अनाथ आणि दरिद्री जीवन जगणे मुरळ्यांच्या नशिबी येते. नात्याने आई आणि मुलगी असलेल्या तुळसा आणि सीता या मुरळ्या 'चिखलातील कमळ' कादंबरीतील मुख्य व्यक्तिरेखा आहेत. मुरळ्यांभोवती दैहिकतेचा चिखल असला, तरी हृदयाने त्या चिखलातून उगवणाऱ्या कमळाप्रमाणे निर्मळ, शुद्ध व पवित्र असतात असे 'चिखलातील कमळ' हे कादंबरीचे शीर्षक सुचवते.

'टिळा लाविते मी रक्ताचा' या शीर्षकानेही ओळखली जाणारी 'आवडी' ही कादंबरी प्रागतिक विषयावरील आहे. जातिभेद मानणाऱ्या पूर्वीच्या महाराष्ट्रात धनाजी रामोशी या आपल्यापेक्षा हलक्या जातीच्या तरुणाबरोबर रहाण्याचे धाडस करणाऱ्या आवडी चौगुले या वरच्या जातीतील मुलीची ही कहाणी आहे. आवडीचा भाऊ नागू हा तिचा अपमान करण्यासाठी मुद्दाम तिचे लग्न बोरगावच्या एका श्रीमंत घराण्यातील उत्तम भगवानराव पाटील याच्याशी लावून देतो. उत्तम हा अपस्माराचा – फिटसूचा – रुग्ण आहे व अपस्माराचा झटका आल्यावर तो हाती येईल त्या वस्तूचे तुकडे-तुकडे करतो असे नंतर लक्षात येते. त्यामुळे, अशा गोष्टी निमूटपणे सहन करण्याच्या उच्चवर्णियांमधील रिवाजाविरुद्ध आवडी बंड करते आणि हलक्या जातीच्या धनाजीबरोबर निघून जाते. धनाजीपासून तिला गर्भ राहिल्याने नागू तिच्यावर प्रचंड संतापतो. हलक्या जातीच्या माणसाची पत्नी बनून तिने आपल्या घराण्याला कलंक लावला आहे असे त्याला वाटते. त्यामुळे, ती आपल्या नातेवाइकांना भेटायला माहेरी आलेली असताना नागू तिचा खून करतो. आपल्या पत्नीच्या नागूने केलेल्या खुनाचा बदला घेण्याचे धनाजी ठरवतो. नंतर, खुनासाठी झालेली चौदा वर्षांच्या तुरुंगवासाची शिक्षा भोगून नागू मुक्त झाल्यावर, ज्या ठिकाणी नागूने आवडीचा खून केलेला असतो, त्याच ठिकाणी धनाजी नागूचे प्राण घेतो. ही कादंबरी जातिभेदाच्या भिंती नष्ट करण्याची कादंबरीकाराची इच्छा व प्रयत्न दाखवते.

देशाचे रक्षण करणाऱ्या सैनिकांच्या, ग्रामीण भागात रहाणाऱ्या पत्नींचे जीवन कसे असुरक्षित असते, हे 'रत्ना' या कादंबरीत अण्णा भाऊंनी दाखवले आहे.

## 3: प्रेमाचे चित्रण करणाऱ्या कादंबऱ्या

जिच्यामध्ये प्रेमकथा नाहीत, अशी जगात बहुधा एकही भाषा नसेल. भारतामध्ये संस्कृत भाषा प्रेमकथांनी खूप समृद्ध आहे. प्रेमकथालेखनाची परंपरा संस्कृतमधूनच इतर भारतीय भाषांमध्ये आली असावी.

प्राचीन मराठी साहित्यात 'महदम्बेचे धवळे', 'नल-दमयंती स्वयंवर' आणि इतर प्रेमकथा आहेत. मराठीतील पंडित कवींनी देव-देवतांना केंद्रस्थानी कल्पून अनेक प्रेमकथा लिहिल्या. नंतर तंत कवींच्या शाहिरी काव्यात प्रेमकथा बहरल्या. प्रेम आणि शृंगार हा शाहिरी काव्याचा खास प्रांत होता. एकोणिसाव्या शतकापासून मराठीत नाटक, कविता, कथा आणि कादंबऱ्या यांच्यामध्ये प्रेमभावनेचे चित्रण करण्यात येत असलेले दिसते. प्रेमभावनेचे चित्रण हे मराठी कादंबरीचे एक आवडते क्षेत्र आहे.

या प्रकारामध्ये येणाऱ्या अण्णा भाऊंच्या कादंबऱ्या अशा आहेतः 'अलगूज' (1962), 'रानगंगा', 'अहंकार', 'आग', 'रूपा', 'आघात', 'गुलाम', 'मयूरा' आणि 'मूर्ती'. या कादंबऱ्यांपैकी बहुतेक कादंबऱ्या ग्रामीण पार्श्वभूमीवरील प्रेमकथा आहेत.

'अलगूज' ही अण्णा भाऊंची लेखनक्रमानुसार पाचवी कादंबरी असली, तरी प्रेमभावनेचे चित्रण करणाऱ्या कादंबऱ्यांपैकी पहिली आहे. रंगू आणि तिचा प्रियकर बापू खरवटे यांच्या प्रेमाची ही कहाणी आहे. रंगू ही गणू मोहिते नांवाच्या सधन व कुलीन शेतकऱ्याची मुलगी असते. उलट, बापू गरीब असतो आणि गणू मोहितेच्या घरी एक नोकर म्हणून काम करीत असतो. पण रंगूला बापूचे अलगूज वाजवण्यातले कौशल्य खूप आवडते. त्यामुळे ती त्याच्या प्रेमात पडते. प्रेमिकांच्या मार्गात येणाऱ्या नेहेमीच्या अडचणी पार करून शेवटी रंगू आणि बापू लग्न करण्यात यशस्वी होतात. 'ज्यांचा शेवट गोड ते सारेच गोड' असे सुचवणाऱ्या अण्णा भाऊंच्या सुखान्त कादंबऱ्यांपैकी 'अलगूज' ही पहिली कादंबरी आहे.

'रानगंगा' या कादंबरीचे शीर्षक कान्हेरी व करुंगाळी या दोन गावांमधून वहाणाऱ्या 'रानगंगा' या नदीवरून देण्यात आले आहे. या कादंबरीची नायिका आणि नायक हे एकमेकांशी वैर असलेल्या दोन व्यक्तींची मुले असतात. त्यांच्या प्रेमामुळे वैरी कुटुंबांचा पुन्हा समेट कसा होतो हे या कादंबरीत दाखवले आहे.

'संघर्ष' ही कादंबरी म्हणजे सुलभा आणि तिचा प्रियकर आनंद यांच्यामधील दुर्दैवी प्रेमाची कथा आहे. सुलभा आणि आनंद अगदी लहानपणापासून एकमेकांवर



प्रेम करीत असतात. पण सुलभाच्या वडिलांचे तिच्या प्रियकराच्या वडिलांशी वैर असेत. त्यामुळे सुलभाचे वडील तिचा विवाह मुद्दाम दिल्ली येथील आयकर कार्यालयात नोकरी करीत असलेल्या बाबासाहेब याच्याशी लावून देतात. पण, बाबासाहेब स्वभावाने हेकट असल्याने ती घटस्फोट घेते, परिचारिका होते आणि भारतीय सेनेत परिचारिका म्हणून काम करू लागते. सेनेच्या रुग्णालयात तिची आनंदशी भेट होते. आनंद सैन्यात भरती झालेला असतो व लढाईत जखमी झाल्याने त्याला सेनेच्या रुग्णालयात दाखल केलेले असते. दोघांची पुन्हा भेट झाल्याने त्यांचे पूर्वीचे प्रेम पुन्हा बहरते आणि शेवटी त्यांचा विवाह होतो. सुलभा आणि आनंद या प्रमुख व्यक्तिरेखा जणू भारत-पाकिस्तान आघाडी आणि आपली व्यक्तिगत व भावनिक आघाडी अशा दोन आघाड्यांवर लढत असतात.

'अहंकार' ही कादंबरी अवाजवी अहंकार एखाद्या स्त्रीचे आयुष्य कसे नष्ट करू शकतो हे दाखवते. या कादंबरीची नायिका अवंतिका ही अहंकाराची बळी ठरते. तिचे पालनपोषण तिचे मामा आबासाहेब इनामदार यांनी केलेले असते. खरे तर आबासाहेबांचा मुलगा रामराव आणि अवंतिका एकमेकांवर प्रेम करीत असतात. पण एके दिवशी रामराव अवंतिकेजवळ शरीरसुखाची मागणी करतो, तेव्हा अहंकारी अवंतिका त्याचा अपमान करते. त्यामुळे, तिचे वडील जेव्हा त्याच्यापुढे अवंतिकेशी विवाहाचा प्रस्ताव ठेवतात, तेव्हा रामराव तो झिडकारतो. तिचा अहंकारी स्वभाव तिला संकटात टाकतो, आणि एखाद्या व्यक्तीला सुखी जीवन जगायचे असेल तर तिने आपला अहंकार मर्यादेत ठेवायला हवा हा जन्माचा धडा शिकवतो.

'रूपा' या कादंबरीत एखाद्या चित्रपटात असतो, तसा नेहमीचा त्रिकोण आहे – रूपा (नायिका), दिनकर (नायक) आणि गजा नांगर (खलनायक). यांच्याशिवाय मथीबाई ही एक व्यक्तिरेखा आहे. ती बाजू बदलणारी आहे, कारण सुरुवातीला ती गजा याला रूपाच्या प्राप्तीसाठी मदत करीत असते, पण परिस्थिती आणि अपयश यांच्यामुळे ती बाजू बदलते आणि दिनकर व रूपा यांना मदत करू लागते. दिनकर आणि रूपा यांना लग्न करायचे असते. ते आपली इच्छा अखेर पुरी करतात.

'आग' ही कादंबरी म्हणजे अनंत चव्हाण हा भावनाशील व प्रसिद्ध लेखक एका तरुणीच्या प्रेमात पडल्यामुळे कसा उद्ध्वस्त होतो, याची कथा आहे. ही एका अधुऱ्या प्रेमाची कहाणी आहे.

'आघात' ही कादंबरी फ्लॅशबॅक तंत्राने लिहिलेली आहे. शाम आणि रोझी

यांच्या प्रेमाची ही कथा त्यांच्या नोंदणी विवाहापाशी संपते. या कादंबरीत मुंबईतील एका झोपडपट्टीचे विविध पैलू चित्रित करण्यात आले आहेत. हे पैलू म्हणजे गुन्हेगारी, ईर्ष्या, नीचपणा आणि अर्थात् माणुसकी व सहृदयता. शाम हा एक चित्रकार या कादंबरीचा नायक आहे. तो मुंबईत येऊन एका झोपडपट्टीत राहू लागतो व पेंटर म्हणून काम करू लागतो. आपल्या कुटुंबापुरते कमावू लागतो व आनंदात राहू लागतो. परंतु, शामच्या शेजारी रहाणारी ताकवाली नांवाची, चारित्र्याने सैल असलेली महिला स्त्रीसुलभ मत्सरापोटी श्यामच्या पत्नीला जाळून मारते. याचा शामच्या मनावर असह्य आघात होतो. तरीही, रोझीचे प्रेम त्याला या आघातावर मात करण्यामध्ये आणि पुन्हा सामान्य जीवन सुरू करण्यामध्ये मदत करते.

एका जमीनदाराच्या पदरी असलेल्या, वेठबिगारी करणाऱ्या मजुराबद्दल त्या जमीनदाराच्या मुलीला वाटत असलेल्या प्रेमामुळे त्या मजुराची गुलामगिरी कशी संपते, हा 'गुलाम' या कादंबरीचा विषय आहे. सदू हा एक वयस्कर माणूस जमीनदार रावसाहेबांकडे वेठबिगारीवर काम करीत असतो. त्याच्या अंगात खूप ताप असतानाही रावसाहेबांनी त्याला शेतनांगरायला लावल्याने तो मरतो. सदूचा मुलगा वासू यालाही जमीनदार वेठबिगार बनवतात. पण रावसाहेबांची एकुलती एक कन्या मीनाक्षी वासूच्या इतकी प्रेमात पडते, की तो थोडे शिक्षण घेऊन तिच्या वडिलांकडे परत आल्यावर ती त्याच्याशी शरीरसंबंधही ठेवते. मीनाक्षी आणि वासू यांनी लग्नही केले असते; पण मथी नांवाची दुसरी एक तरुणी वासूच्या प्रेमात आहे असे मीनाक्षीला समजते. तेव्हा मथीच्या समाधानासाठी मीनाक्षी वासूला मथीशी लग्न करण्याची परवानगी देते आणि त्याला वेठबिगारीतून मुक्त करते.

'मयूरा' ही आणखी एक साधी-सरळ आणि साचेबंद प्रेमकथा आहे. एक गरीब तरुण – त्याची एका श्रीमंत मुलीशी भेट – ती मुलगी त्याच्या प्रेमात पडते – तो गरीब असूनही त्याच्याशी लग्न करते हा तो साचा. 'मयूरा' ही चंदन नांवाचा एक गरीब मुलगा आणि श्रीमंत बापाची मुलगी असलेली मयूरा यांच्यातील प्रेमाची व त्यांच्या लग्नाची कहाणी आहे. मयूराचे मूळ नांव नीलिमा असे असले, तरी तिला मोर खूप आवडत असल्याने तिच्या वडिलांनी तिचे नांव 'मयूरा' असे ठेवलेले असते.

तरुणांनी जातिभेदाच्या भिंती नष्ट कराव्यात व आंतरजातीय विवाह करावेत या मताचे समर्थन 'मूर्ती' या कादंबरीत अण्णा भाऊंनी केले आहे. या कादंबरीचा नायक वसंत हा एक अनाथ, संवेदनाशील व चित्रकलेत कुशल असा शाळकरी



विद्यार्थी असतो. तो उच्च जातीतील मूर्ती नांवाच्या वर्गमैत्रिणीच्या प्रेमात कसा पडतो आणि वेगवेगळ्या जातींचे असूनही ते कसे विवाह करतात हे या कादंबरीत दाखवले आहे.

वर चर्चा केलेल्या कादंबऱ्यांव्यतिरिक्त अण्णा भाऊंच्या आणखीही काही कादंबऱ्यांमध्ये प्रेमाचे चित्रण आहे. त्या कादंबऱ्या अशाः

'वारणेच्या खोऱ्यात' हीसुद्धा एक प्रकारची प्रेमकथाच आहे. पण तिला भारताच्या स्वातंत्र्यलढ्याचा पार्श्वपट असल्याने तिच्यातील प्रेमाचे चित्रण गौण ठरले आहे. एखादी व्यक्ती आपल्या प्रिय व्यक्तीच्या ध्येयाशी किती एकरूप होऊ शकते, याचे उदाहरण ही कथा दाखवते.

माकडाचे खेळ दाखवणाऱ्या यंकूची कन्या दुर्गा ही 'माकडीचा माळ' या कादंबरीची नायिका आहे. ग्रामीण भागातील श्रीमंत आणि गुंड यांच्या लैंगिक अत्याचारांना कंटाळून ती आपल्या प्रियकराबरोबर जंगलात पळून जाते.

'अग्निदिव्य' या कादंबरीची नायिका रत्ना हिच्यावर तिच्या पतीच्या मित्राने बलात्कार केल्याने तिला गर्भ रहातो. ती मुलाला जन्म देते आणि त्याचे पालन-पोषण करते.

'फुलपाखरू' या कादंबरीत राजा नांवाच्या तरुणाचा पुरोगामीपणाचा आदर्श चित्रित करण्यात आला आहे. रोहिणीला वेश्येचे जीवन जगण्यास भाग पाडले गेलेले आहे हे ठाऊक असूनही तो तिच्याशी लग्न करायला तयार होतो.

## 4 : ग्रामीण जीवनाचे चित्रण करणाऱ्या कादंबऱ्या

अण्णा भाऊंनी लिहिलेल्या एकूण कादंबऱ्यांपैकी पूर्णपणे ग्रामीण पार्श्वभूमी असलेल्या कादंबऱ्यांची संख्या लक्षणीय आहे. ग्रामीण जीवनाचे त्याच्या विविध पैलूंसह अतिशय समर्थ व प्रामाणिक चित्रण हे या कादंबऱ्यांचे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे.

या गटामध्ये प्रामुख्याने येणाऱ्या कादंबऱ्या म्हणजे 'माकडीचा माळ', 'वैर' (1964), 'डोळे मोडीत राधा चाले', 'रानबोका', 'कुरूप', 'पाझर' आणि 'केवड्याचे कणीस'.

'माकडीचा माळ' ही अण्णा भाऊंच्या पाच सर्वोत्तम कादंबऱ्यांपैकी एक आहे असे म्हटले तरी चालेल. मराठी साहित्यात प्रथमच, सुगीच्या दिवसांमध्ये खेड्यांच्या बाहेर एखाद्या टेकडीवर किंवा माळावर पाले उभारून त्याच्यामध्ये रहाणाऱ्या भटक्या

जाती-जमातींचे अत्यंत प्रामाणिक, समर्थ आणि जिवंत चित्रण या कादंबरीत करण्यात आले आहे. हे या कादंबरीचे सर्वात महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. अण्णा भाऊंनी अतिशय बारकाईने या भटक्या लोकांची जीवनपद्धती, त्यांचे संघर्ष, त्यांची दुःखे, त्यांच्यातील प्रेमप्रकरणे, त्यांची नीतिमत्ता, व्यवसाय, रीतिरिवाज, दंडक, त्यांच्यामधील पोटजाती आणि सुस्थिर समाजाचा त्यांच्याबद्दलचा दृष्टिकोण यांचे चित्रण केले आहे. पारंपरिक मराठी साहित्याच्या वाचकासाठी या कादंबरीत केलेले, ग्रामीण भागातील भटक्यांचे चित्रण पूर्णपणे नवीन आहे. या कादंबरीत यंकू या माकडवाल्याची मुलगी दुर्गा आणि सख्या माकडवाल्याचा मुलगा येमू यांच्यातील उत्कट प्रेमाचे चित्रण केले आहे. दुर्गा आणि येमू यांना कोणकोणत्या अडचणींतून जावे लागते, अखेर कशा प्रकारे एके रात्री पाऱ्या या खलनायकाने चिथावून पाठवलेल्या दोन चोरांशी लढताना यंकूचा मृत्यू होतो याचेही चित्रण कादंबरीत करण्यात आले आहे.

'वैर' ही कादंबरी एकंदर भारतातील व विशेषतः महाराष्ट्रातील ग्रामीण भागातील जमीनदारी पद्धत, सामान्य माणसांची पिळवणूक आणि जमीनदारांची जुलूमजबरदस्ती यांच्याबद्दल आहे. या कादंबरीला 'वैर' असे शीर्षक दिलेले आहे, कारण येळापूर गावातील गोपाळराव इनामदार या जमीनदाराचे आपल्या जवळजवळ संपूर्ण गावाशीच वैर असते. काही खलप्रवृत्तीच्या गुंडांच्या सहाय्याने तो गावकऱ्यांना चिरडण्याचा प्रयत्न करतो. ज्या गावात आपण रहातो, त्या संपूर्ण गावाशी वैर करणे हे धोकादायक व चुकीचे असते हे त्याला फार उशीरा, अगदी शेवटी उमगते. पण ही फार उशीरा झालेली जाणीव असते, आणि जेव्हा त्याला ही जाणीव होते, तेव्हा त्याचाच एक साथीदार गुंड्या त्याला मारून टाकतो. येळापूर गावातील 'आहे रे' वर्गातील एक सधन शेतकरी आणि 'नाही रे' वर्गातील अनेक गरीब शेतकरी यांच्यातील वर्गसंघर्षाचे चित्रण म्हणूनही या कादंबरीचा अभ्यास करता येतो. अण्णा भाऊंनी आपल्या प्रत्यक्ष जीवनात स्वीकारलेल्या, वर्गसंघर्षाच्या साम्यवादी तत्त्वज्ञानाशी हे सुसंगतच आहे.

'डोळ मोडीत राधा चाले' या कादंबरीचे शीर्षक महाराष्ट्रातील संत एकनाथ यांच्या 'वारियाने कुंडल हाले । डोळे मोडीत राधा चाले' या प्रसिद्ध गवळणीच्या ध्रुवपदातून घेण्यात आले आहे. स्त्रीच्या वागणुकीतील मनमोकळेपणाचा ग्रामीण भागातील खलप्रवृत्तीच्या लोकांकडून कसा विपरीत अर्थ लावला जातो आणि त्यामुळे अनेकांच्या जीवनात दुःखद घटना कशा घडतात याचे चित्रण या कादंबरीत करण्यात आले आहे.



'रानबोका' या कादंबरीतील सुरळ गावातील काही वाईट प्रवृत्तीच्या व्यक्तिरेखा कोंबड्या, कोंबडे व त्यांच्यासारखेच निष्पाप पक्षी-प्राणी मारणाऱ्या रानबोक्यासारख्या स्वभावाच्या असतात, म्हणून या कादंबरीला 'रानबोका' हे शीर्षक दिलेले आहे. ज्यांना या 'रानबोक्यां'चा उपद्रव होतो, अशा लोकांकडून कधी-ना-कधी हे रानबोके त्यांच्या घृणास्पद गुन्ह्यांसाठी मारून टाकले जातात. त्याचप्रमाणे, काही काही खलप्रवृत्तीची पात्रे या कादंबरीत मारून टाकली जातात. या कादंबरीत मोहना, संभाजी चौगुले आणि लक्ष्मी असा प्रेमाचा त्रिकोणही आहे. मोहना ही तमाशातील एक नर्तकी असते. संभाजी चौगुले हा चिमाबाई चौगुले यांचा एकुलता एक मुलगा असतो. आपला मुलगा तमाशातल्या नर्तकीवर अनुरक्त झाला आहे हे लक्षात आल्यावर चिमाबाई संभाजीचे लग्न लक्ष्मीशी ठरवतात. परंतु, मोहनाने संभाजीला लक्ष्मीशी लग्न करण्यासाठी परवानगी देऊन केलेल्या त्यागाची लक्ष्मीला जाणीव असल्याने ती संभाजीला मोहनाशी दुसरे लग्न करण्याची लेखी अनुमती देते.

'कुरूप' (इथे अर्थ : चिघळलेली जखम) या कादंबरीची कथा महाराष्ट्रातील दोन पाटील परिवारांमधील नेहेमीच दिसणाऱ्या स्पर्धेची पारंपरिक व साचेबंद कथा आहे. म्हणजेच, यातील एक व्यक्तिरेखा चांगल्याचे प्रतिनिधित्व करते, तर दुसरी व्यक्तिरेखा वाईटाचे प्रतिनिधित्व करते. 'कुरूप' हे कादंबरीचे शीर्षक प्रतीकात्मक आहे. कारण बाबा पाटील हा खलनायक आपल्या दुष्टपणामुळे व अत्याचारीपणामुळे गावकऱ्यांसाठी एक प्रकारचे कुरूपच बनला आहे. पण दादा पाटील हा बाबा पाटलाच्या वाईट चालींशी चांगलाच सामना देतो. परंतु, तापामुळे दादा मरण पावतो आणि बाबा पुन्हा आपले अत्याचार सुरू करतो. दादाची पत्नी हरणाबाई हिच्याबद्दल बाबाला लैंगिक आकर्षण वाटत असते. तिच्यावर अत्याचार करण्यासाठी एका रात्री दादाच्या घरात घुसण्याचा प्रयत्न करीत असताना, हरणाबाईने झाडलेल्या पिस्तुलातील गोळ्यांमुळे तो मारला जातो. गावकऱ्यांना एखाद्या कुरूपाप्रमाणे उपद्रव देणाऱ्या बाबा पाटलाचा अशा प्रकारे काटा काढला जातो.

'पाझर' या कादंबरीत आकुबा आणि तुकोबा या गावगुंडांच्या गुंडगिरीमुळे पारगाव नावाच्या खेड्यातील मायेचा पाझर कसा आटतो, या गुंडांचा शेवटी पराभव कसा होतो आणि गावातील मायेचा पाझर पुन्हा कसा वाहू लागतो याचे चित्रण करण्यात आले आहे. या कादंबरीत चंद्रा आणि नाना यांच्या प्रेमाचे व विवाहाचेही चित्रण आहे.

'केवड्याचं कणीस' ही गुंड्या नांवाचा एक पहिलवान आणि त्याचे साथीदार

यांच्या मूर्खपणाची एक सामान्य अशी कथा आहे.

'तारा' या कादंबरीचे कथानक अण्णा भाऊंच्या प्रेमकथांच्या नेहमीच्या कथानकांपेक्षा वेगळे आहे. नेहमीच्या प्रेमकथांमध्ये एखाद्या स्त्रीचा काही खलपुरुषांकडून पाठलाग होत असतो, पण तिचे प्रेम दुसऱ्याच कुणा पुरुषावर असते. शेवटी त्या खलपुरुषांना या ना त्या प्रकारे मार्गातून हटवून नायिका आपल्या प्रियकराशी लग्न करते. परंतु 'तारा'ची कथा अशा नेहमीच्या प्रेमकथांपेक्षा बरीच वेगळी आहे. तारा ही अनिल पाटील नांवाच्या एका डाकूसाठी हेर, मदतनीस आणि खबरी म्हणून काम करीत असते. अनिल पाटील मॅट्रिक (शालान्त) परीक्षा पास झाल्यानंतर उपजीविका करण्यासाठी बंड्या वाघ या खोट्या नांवाने दरोडे घालू लागतो व तत्सम गुन्हे करू लागतो. तो तारा नावाच्या सुंदर मुलीला आपल्या जाळ्यात पकडतो, आणि तिचा वापर एखाद्या मोहिनीसारखा व खबर पुरवणाऱ्या व्यक्तीसारखा करून घेतो. तिने दिलेल्या माहितीच्या आधारे तो दरोडे घालतो. अशा प्रकारे दरोडे घालून ते लोकांची मालमत्ता लुटत रहातात. पण त्यांच्या कारवाया लवकरच उघडकीस येतात. त्यामुळे सी.आय.डी. पोलिसांना तारा हिला अटक करण्याचा आदेश दिला जातो. योगायोग म्हणजे, तिची आणि तिला पकडण्यासाठी नेमलेल्या सी.आय.डी. अधिकाऱ्याची भेट होते, ते एकमेकांच्या प्रेमात पडतात आणि त्यांचे लग्न होते. अर्थात् ते एकमेकांना आपली खरी नांवे न सांगता खोटी नांवे सांगतात. अनिल पाटील हा शेवटी पोलिसांकडून मारला जातो.

याव्यतिरिक्त अण्णा भाऊंनी आपल्या कादंबऱ्यांमध्ये दीन, दलित, अवहेलित, मागास जातीजमातींतील व्यक्तिरेखांचेही चित्रण केले आहे. या व्यक्तिरेखा वर्ग, पंथ आणि जाती यांनी त्यांच्यासाठी घालून दिलेल्या मर्यादा ओलांडून जगत असतात. त्यामुळे, दलित व्यक्तिरेखा आणि त्यांचा संघर्ष यांचे चित्रण हे अण्णा भाऊंच्या लेखनाचे एक बलस्थान आहे.

कादंबरीकार म्हणून अण्णा भाऊंच्या कामगिरीचा सारांश सांगताना असे म्हणता येईल, की त्यांच्या उत्तम दर्जाच्या कादंबऱ्या आणि साधारण दर्जाच्या कादंबऱ्या यांच्यामध्ये एक स्पष्ट अशी व्यवच्छेदक रेषा आहे. एक कादंबरीकार म्हणून अण्णा भाऊंचे मराठी साहित्यातील स्थान निश्चित करण्याचा प्रश्न येतो, तेव्हा संख्येने थोड्या असलेल्या त्यांच्या साधारण दर्जाच्या कादंबऱ्याच त्यांना वादग्रस्त कादंबरीकार बनवतात. अशा वेळी आपण हे लक्षात घेतले पाहिजे, की अण्णा भाऊ जेव्हा गरिबी, गरजा, निराशा, फसवणूक व बेचैनी अशा गोष्टींनी गांजलेले होते, त्या त्यांच्या आयुष्यातील दुर्दैवी अशा अखेरच्या कालखंडात या सामान्य



कादंबऱ्या लिहिल्या गेल्या आहेत. परंतु त्यामुळे कादंबरीकार म्हणून त्यांची जी मूलभूत प्रतिष्ठा आहे, ती या कादंबऱ्यांमुळे दुष्प्रभावित होत नाही.



# 3

# लघुकथा

अण्णा भाऊंनी अनेक साहित्यप्रकार हाताळले असले, तरी त्यांची अंगभूत प्रतिभा ही एका कथालेखकाची होती, असे त्यांच्या साहित्याच्या जाणकार वाचकांचे व संशोधकांचे मत आहे. अण्णा भाऊंनी कथालेखनाला 1949 मध्ये आरंभ केला व 1969 मध्ये आपल्या मृत्यूपर्यंत ते कथा लिहीत होते. 1949 पासून त्यांनी बऱ्याच कथा लिहिल्या असल्या, तरी त्यांचा संग्रह मात्र 1957 पर्यंत निघू शकला नाही. याला अनेक कारणे होती – अण्णा भाऊ तेव्हा लेखक म्हणून नवीन होते, हस्तिदंती मनोऱ्यात रहाणाऱ्या तत्कालीन वाचकांच्या मते अण्णा भाऊंच्या कथांचे विषय हे मुळी विषयच नव्हते, आणि तेव्हाच्या प्रकाशकांचा आणि समीक्षकांचा तथाकथित 'कलात्मक मूल्यां'साठी आग्रह होता. तरीही, या अडचणींवर मात करून अण्णा भाऊंचा 'खुळंवाडी' हा कथासंग्रह 1957 साली प्रकाशित झाला. उपलब्ध माहितीनुसार त्यानंतर अण्णा भाऊंचे एकूण वीस कथासंग्रह प्रकाशित झाले.

अण्णा भाऊंनी इतक्या कथा लिहिल्या, तरीसुद्धा त्यांच्या हयातीत समीक्षकांनी त्यांची फारशी दखल घेतली नाही. तत्कालीन समीक्षकांच्या कठोर व पुराणमतवादी वृत्तीमुळे कथाकार म्हणून ते उपेक्षितच राहिले. ते स्वतःसुद्धा आपले हे शल्य बोलून दाखवीत. समीक्षकांनी केलेल्या अण्णा भाऊंच्या उपेक्षेची कारणे त्यांनी मराठी कथालेखनाच्या क्षेत्रात विषय, पार्श्वभूमी, भाषा आणि शैली यांच्या संदर्भात केलेल्या युगप्रवर्तक कार्यामध्येच आहेत. त्या काळच्या श्री. ना. सी. फडके या प्रस्थापित कथालेखकांशी अण्णा भाऊंचे कुठल्याही बाबतीत साम्य नव्हते. फडके यांचा कथालेखनाच्या संदर्भात तथाकथित तंत्र व कलामूल्ये यांच्यासाठी आग्रह असे, तर अण्णा भाऊंना त्यांची कधीच पर्वा नसे. अण्णा भाऊंच्या काही कथा



तर अशा आहेत, की त्यांना किस्सा म्हणावे, की दीर्घकथा म्हणावे की कादंबरिका म्हणावे हे सांगणे अवघड आहे.

अण्णा भाऊंच्या कथांबद्दल समीक्षक आणि काही नागरी वाचकांचे मत काहीही असले, तरी मराठी साहित्याच्या सर्वसाधारण व सहृदय वाचकांनी मात्र त्यांच्या कथांचे खूप स्वागत केले, त्यांना त्या कथा खूप आवडल्या. नंतर त्या कथा फक्त मराठी वाचकांपर्यंतच मर्यादित राहिल्या नाहीत, तर अनुवादांमधून त्या सर्व प्रमुख भारतीय भाषांतील वाचकांपर्यंत पोचल्या. त्यांचे जर्मन, झेक, इंग्लिश, पोलिश, रशियन आणि स्लोवाक इत्यादी विदेशी भाषांतही अनुवाद झाले.

अण्णा भाऊंनी लेखन सुरू केले, कारण ज्याबद्दल लिहिले जाऊ शकते आणि लिहिले जायला हवे असे आपल्याजवळ बरेच काही आहे याची जाणीव त्यांना होती. आपण अगदी वेगळ्या प्रकारे लिहू शकतो; आणि आपण जे जगलो, जे भोगले ते त्याच्या सर्व पैलूंनिशी नोंदवणे हे आपले जीवितकार्य आहे असेही त्यांना वाटत होते. पण आयुष्याच्या अखेरच्या काही वर्षांत वाढत्या गरजा आणि त्या पुरवण्यासाठी साधनांची कमतरता यामुळे कधी जाणूनबुजून, कधी इच्छा नसताना तर कधी असहायतेपोटी त्यांना आपल्या कथेचे कादंबरीत; कादंबरीचे कथेत, नाटकात किंवा लोकनाट्यात अशी रूपांतरे करावी लागली. असे असले, तरी मराठी साहित्यातील एक कथालेखक म्हणून त्यांचे स्थान महत्त्वाचे आहे.

अण्णा भाऊंच्या कथांचे साधारणपणे पुढील प्रकारांमध्ये वर्गीकरण करता येईलः

1. सामाजिक, ऐतिहासिक, राजकीय व दलित जीवनावरील कथा.
2. कलात्मक व विनोदी कथा.
3. शोकान्त व हृदयद्रावक कथा.
4. आत्मचरित्रात्मक कथा.
5. गुन्हेगारी जीवनाचे चित्रण करणाऱ्या कथा.
6. अंधश्रद्धांविरुद्धच्या कथा.
7. प्रेमकथा.
8. कौटुंबिक कथा

### सामाजिक, ऐतिहासिक, राजकीय व दलित जीवनाचे चित्रण करणाऱ्या कथा

ज्या कथांनी अण्णा भाऊंच्या शिरपेचात अनेक मानाचे तुरे खोवले, त्यांना

लेखक म्हणून प्रतिष्ठा मिळवून दिली आणि समाजाच्या सर्व थरांतील तसेच विविध देशांतील वाचकांना प्रभावित केले अशा अण्णा भाऊंच्या सर्वश्रेष्ठ कथा या प्रकारामध्ये येतात. या कथांमधील व्यक्तिरेखा अन्यायाविरुद्ध लढताता किंवा कोणीतरी त्यांच्यासाठी अन्यायाविरुद्ध लढते. आचार्य प्र. के. अत्रे यांनी अण्णा भाऊंच्या या प्रकारच्या कथांचे पुढील शब्दांत कौतुक लेले आहेः

"अण्णा भाऊ साठे यांच्या कथेचे एका वाक्यात वर्णन करावयाचे झाल्यास असे सांगता येईल की, ही जगण्यासाठी लढणाऱ्या माणसाची कथा आहे. ही कच खाणारी, हरणारी माणसे नाहीत. या सर्वांना मानाने जगायचे आहे आणि आक्रमक वृत्तींशी निकराने लढून त्या सामन्यात त्यांना जिंकायचेही आहे... वार झेलायला त्यांची छाती नेहमीच ताठ्याने उभारलेली आहे... त्यांच्या कथांमध्ये इथून तिथून एकच झुंजार मराठबाणा आवेशाने स्फुरताना दिसून येतो. या पराक्रमाच्या कथा अण्णा भाऊंनी तितक्याच तेजस्वी भाषेत रंगविलेल्या आहेत."

आचार्य अत्रे यांच्या वरील विधानांची साक्ष अण्णा भाऊंच्या 'खुळंवाडी' या पहिल्या कथासंग्रहातील कथा देतात.

जेव्हा दलितांना अडचणी येतात आणि सामाजिक न्यायाचा प्रश्न येतो, तेव्हा एरवी मवाळ असणाऱ्या दलितेतर व्यक्तीसुद्धा जहाल पवित्रा घेतात, असे अण्णा भाऊ आपल्या कथांमधून दाखवतात. उदाहरणार्थ, 'खुळंवाडी' संग्रहातील 'विष्णुपंत कुलकर्णी' या कथेतील विष्णुपंत हे साधारणपणे मवाळ वृत्तीच्या ब्राह्मण समाजाचे असले, तरी 1918 मधील दुष्काळ आणि रोगराई यांच्यामुळे होणारे दलितांचे हाल पाहून ते दलितांना क्रांतिकारी सल्ला देतात – 'काहीही करा, पण जगा! तुम्ही साऱ्यांनी जगायलाच हवं!' ते दलितांना मठातील धान्य लुटून जगण्याचा मार्ग सुचवतात. दलित ते धान्य लुटतात. त्यांच्याविरुद्ध गुन्हा नोंदवला जातो, आणि त्यांना अटक होते. पण विष्णुपंत इथेही सरकारविरुद्ध लढतात आणि अटक केलेल्या दलितांना मुक्त करायला लावतात.

'बंडवाला' या कथेत अन्यायाविरुद्ध उभा रहाणारा मांग समाजातील एक तरुण आपल्याला दिसतो. या कथेत एक इनामदार एका निष्पाप मांगाची ऐंशी बिघे (हेक्टर) जमीन अगदी मामुली रकमेसाठी गहाण म्हणून ठेवून घेतो. दोन पिढ्यांपर्यंत ती जमीन इनामदाराच्या ताब्यात रहाते. ज्या मांगाने ही जमीन गहाण ठेवलेली असते, त्याचा नातू तात्या ही जमीन इनामदाराच्या कचाट्यातून सोडवण्याचा प्रयत्न करतो. या प्रयत्नांमध्ये दोन वेळा इनामदाराला मारहाण करण्याच्या आणि त्याचा खून करण्याच्या खोट्या आरोपांखाली तात्याला तुरुंगवास सहन करावा लागतो. जमिनीचा ताबा पुन्हा मिळवण्यासाठीचे सारे मवाळ व कायदेशीर मार्ग जेव्हा व्यर्थ ठरतात, तेव्हा, शेवटी तात्या बंडखोर होतो.



'रामोशी' ही कथा दोन उद्दाम जमीनदारांमधील भांडणामध्ये गरीब, प्रामाणिक आणि निष्पाप लोकांची जीवने कशी भरडून निघतात, सरकारी यंत्रणा कशी भ्रष्ट असते आणि त्यामुळे होणारा छळ कशा प्रकारे संवेदनशील अशा सामान्य माणसाला कायदा हातात घ्यायला भाग पाडतो हे दाखवते. माळदण या गावचा प्रामाणिक राखणदार असलेला यदू रामोशी आपल्या खंडू या एकुलत्या एक मुलाचा खुनी असलेल्या तात्या डोंगरे नांवाच्या जमीनदाराचा सूड घेण्याचा कसा प्रयत्न करतो, तात्या कसा फरारी होतो, तात्याचे नोतवाईक कशा प्रकारे सरकारी यंत्रणेचे हात ओले करण्याचा प्रयत्न करतात, आणि हे ऐकून कायदा आणि सुव्यवस्था राखणाऱ्या यंत्रणेवरील यदूचा विश्वास कसा उडून जातो व कशा प्रकारे तो हातात हत्यार घेऊन, फरारी झालेल्या तात्याला जंगलात मारून टाकतो याची ही कहाणी आहे.

'कोंबडीचोर' ही कथा गरिबीच एखाद्या व्यक्तीला चोरी करायला भाग पाडते आणि गरिबी व भूक नष्ट केल्याशिवाय चोरी आणि तत्सम गुन्हे थांबणार नाहीत हे दाखवते. स्वतंत्र भारताचे सरकार भूक आणि दारिद्र्य कमी करील अशी जनतेची अपेक्षा होती, पण अद्यापही सरकारला या कामी यश आलेले नाही अशी टिप्पणी या कथेत अण्णा भाऊंनी या कथेत केली आहे.

अण्णा भाऊंच्या 'बरबाद्या कंजारी' या दुसऱ्या कथासंग्रहात जगण्यासाठी लढणाऱ्या माणसांच्या अनेक कथा आहेत. त्यांच्यापैकी बऱ्याचशा कथांचे स्वरूप व्यक्तिचित्रणात्मक आहे. लेखकाला ती पात्रे प्रत्यक्षात कुठे-ना-कुठे भेटलेली आहेत. या माणसांच्या जीवनातील दुःखे, गरिबी, असहायता, व्यसने, धाडसे, चतुराई, संघर्ष, अंधश्रद्धा – या साऱ्या गोष्टी अण्णा भाऊंना अगदी चांगल्या ठाऊक होत्या. त्या गोष्टींकडे अण्णा भाऊ पांढरपेशे विरुद्ध श्रमजीवी (बूर्झ्वा विरुद्ध प्रॉलेटेरिएट) या आपल्या कम्युनिस्ट दृष्टिकोनातून पहातात.

'बरबाद्या कंजारी' संग्रहातील त्याच नांवाच्या कथेत आपल्याला मुंबईच्या झोपडपट्ट्यांमध्ये रहाणाऱ्या भटक्या, अशिक्षित आणि गरीब अशा कंजारी समाजातील बरबाद्या नांवाच्या एका व्यक्तीच्या जीवनाचे चित्रण आढळते. बरबाद्या ज्या कंजारी समाजातला आहे, त्या समाजाची दयनीय अवस्था आणि त्या समाजात प्रचलित अमानुष प्रथाही या कथेत चित्रित करण्यात आल्या आहेत. कंजारी समाजात प्रचलित असलेल्या प्रथेप्रमाणे बरबाद्या आपली मुलगी निल्ली हिला दोनशे रुपयांना

डल्लाराम याला विकतो. निल्लीचे लग्न डल्लारामचा मुलगा सइद्या याच्याशी होणार असते. कंजारी समाजातील नियमाप्रमाणे, एखाद्या स्त्रीला आपल्या पतीच्या मृत्यूनंतरही आमरण आपल्या सासरीच रहावे लागते. तोच नियम निल्लीलाही लागू असतो; पण आपल्या नवऱ्याच्या मृत्यूनंतर मिल्ली हा नियम मोडते. ती समोरच्याच झोपडीत रहाणाऱ्या हैदऱ्याबरोबर पळून जाते. कथेत पुढे कंजारी समाजाची जातपंचायत कशा प्रकारे डल्लारामची बाजू घेते, कशा प्रकारे बरबाद्याला वाळीत टाकते, आणि त्या वाळीत टाकण्याला बरबाद्या कसा किंमत देत नाही हे दाखवले आहे.

कालबाह्य आणि अन्यायकारक रीतिरिवाजांना चिकटून राहिलेल्या समाजातील एक प्रगतिशील बंडखोर म्हणून अण्णा भाऊंना बरबाद्याचे चित्रण करायचे असावे.

'सुलतान' ही कथा मार्क्सवादी दृष्टिकोनातून लिहिलेली आहे. एका माणसाचा केवळ पोट भरण्यासाठीचा आयुष्यभरचा – वीस वर्षांचा – संघर्ष आणि त्यामधील त्याचा पराभव हा या कथेचा विषय आहे. कथानायकाचे नांव 'सुलतान' असले, तरी प्रत्यक्षात मात्र तो अगदी गरीब आणि दुर्दैवी माणूस असतो. माणूस शेवटी अन्न, वस्त्र आणि निवारा या आपल्या मूलभूत गरजा पूर्ण करण्यासाठीच झगडत असतो. सामान्य माणूस आपले जीवन प्रामाणिकपणे, सहिष्णूपणे आणि समाजाच्या नीतिनियमांच्या चौकटीत राहून जगण्याचा प्रयत्न करतो. पण एवढे सारे करूनही आपल्याला पोटापुरते अन्नसुद्धा मिळत नाही हे जेव्हा त्याच्या लक्षात येते, तेव्हा अशा भुकेल्या माणसापुढे बंड करण्याशिवाय दुसरा कुठलाही पर्याय रहात नाही.

भारतीय संस्कृतीचा एक निराशाजनक पैलू 'भोमक्या' ही कथा दाखवते. भारतीय संस्कृती ही सात्त्विक, पवित्र आहे असे प्रतिपादन करणारे काही लोक भारतात आहेत; पण अण्णा भाऊ भारतीय संस्कृतीच्या या अवाजवी उदात्तीकरणाशी नेहमीच सहमत होत, असे नाही. याचे कारणे म्हणजे, या देशात लाखो लोक दारिद्र्यात आणि अनेक प्रकारच्या गुलामगिरीमध्ये भरडून निघताना ते पहात होते. त्यांना जरी 'माणसे' म्हटले जात असले, तरी त्यांना समाजात काहीही स्थान नसते. अण्णा भाऊंचा हा दृष्टीकोण 'भोमक्या' या कथेत दिसतो.

'मकुल मुलाणी' ही कथा बेकारी, आणि उपजीविका कमावण्यामधली स्पर्धा ही रक्ताच्या नातेवाईकांनाही एकमेकांचे कट्टर शत्रू कसे बनवते, आणि अखेर आर्थिक स्थैर्य हाच मानवी जीवनातील आनंदाचा पाया कसा आहे, हे दाखवते. बेकारीच्या गर्तेत सापडलेल्या मकुल मुलाण्याच्या कुटुंबाची ही कथा आहे. आर्थिक समस्या मकुलला माणसातून उठवतात, हे या कथेचे सार आहे.



या जगात सत्य हे कधीकधी कल्पितापेक्षाही विचित्र असते असे अण्णा भाऊ एकदा म्हणाले होते. या विधानाला पुरावा म्हणून त्यांच्या 'स्मशानातील सोनं' या कथेचा उल्लेख करता येईल. केवळ अण्णा भाऊंच्या कथांपैकीच नव्हे, तर एकूणच मराठी कथासाहित्यामध्ये 'स्मशानातील सोनं' ही एक अजरामर कथा आहे असे म्हणता येईल. भारतातील गरीब, अशिक्षित आणि बेकारांचे नष्टचर्य या कथेत चित्रित करण्यात आले आहे. गरिबी आणि बेकारी माणसाला दहन आणि दफन केलेल्या प्रेतांचे अवशेष उकरून, प्रेतांची राख चाळून प्रेतावरील सोन्याचे काही कण किंवा किरकोळ दागिने शोधायला भाग पाडते हे या कथेत दाखवले आहे. 'स्मशानातील सोनं' या कथेचा नायक आहे भिमा. तो जिथे काम करीत असतो, ती दगडांची खाण अचानक बंद पडते व तो बेकार होतो. विमनस्कपणे तो नदीकाठी जातो. तिथे त्याला नुकत्याच दहन केलेल्या प्रेताच्या राखेतील सोन्याची अंगठी दिसते, आणि त्याला उपजीविकेचा मार्ग सापडतो. प्रेतांचे अवशेष उकरून, त्यांची राख चाळून मिळालेले सोन्याचे किरकोळ दागिने विकून तो आपले आणि आपल्या कुटुंबाचे पोट भरू लागतो.

एका रात्री भिमा एका स्मशानातील दफन केलेले प्रेत शोधीत असताना कोल्ह्यांचा एक कळप त्याच्यावर हल्ला करतो, कारण ते कोल्हेही दफन केलेले प्रेत खाण्यासाठी आलेले असतात. भिमा आणि तो कोल्ह्यांचा कळप यांच्यामध्ये ते प्रेत ताब्यात मिळवण्यासाठी 'रण' होते. कोल्हे भिमाच्या अंगाचे लचके तोडतात. प्रचंड झटापटीनंतर तो कोल्ह्यांना दूर हाकलण्यात यशस्वी होतो. जेव्हा ते प्रेताच्या तोंडातील सोन्याचा दात काढण्यासाठी त्याच्या तोंडात हात घालतो, तेव्हा एकीकडे त्याचा हात प्रेताच्या तोंडात अडकतो, तर दुसरीकडे कोल्हे पुन्हा त्याच्यावर हल्ला करतात. एका हाताने तो कोल्ह्यांशी लढा देतो, तर दुसऱ्या हाताची बोटे प्रेताच्या तोंडातून सोडवण्याचा प्रयत्न करतो. या प्रसंगाचे वर्णन वाचकांच्या अंगावर शहारे आणते. पुढे, प्रेताच्या तोंडात अडकलेली बोटे मोकळी करण्याच्या प्रयत्नात तो आपली दोन बोटे गमावतो. त्यामुळे हाताने कुठलेही श्रमाचे काम करण्यास तो अपात्र बनतो. नियतीची थट्टा म्हणजे, बंद झालेली दगडाची खाण दुसऱ्याच दिवशी सुरू होत असल्याचे त्याला कळते. या घटनेच्या चित्रणातून अण्णा भाऊ जणू वाचकांना विचारतात, कल्पित हे सत्यापेक्षा आणखी किती विचित्र असू शकेल?

काही कथांमध्ये आपण सत्यामध्ये कल्पनेचे मिश्रण केलेले आहे असे अण्णा भाऊंनी एके ठिकाणी म्हटलेले आहे. 'सापळा' ही कथा त्यांच्या वरील विधानाचे उदाहरण आहे. या कथेतील काही मूलभूत घटक वास्तववादी वाटत नाहीत. डॉ.

बाबासाहेब आंबेडकरांनी दलितांना आवाहन करून जागृती निर्माण केली. त्यामुळे पूर्वी महार असलेल्या दलितांनी मेलेल्या गुरांची विल्हेवाट लावणे व मेलेल्या जनावरांचे मांस खाणे सोडून दिले. त्यामुळे महाराष्ट्राच्या ग्रामीण भागातील दलितेतरांमध्ये वर्णाभिमानामुळे जो संताप उसळला, त्याचे चित्रण 'सापळा' या कथेत सापडते. पारगाव नांवाच्या एका गावातील अस्पृश्यांनी मेलेला बैल ओढून नेण्यास दिलेला नकार, त्यामुळे उच्चवर्णियांनी केलेला अस्पृश्यांना सापळ्यात पकडण्याचा आणि वाळीत टाकण्याचा प्रयत्न, आणि अखेर अस्पृश्यांनी उच्चवर्णियांवर केलेली मात – असे या कथेचे कथानक आहे.

काही काळापूर्वी दलितांमधील विविध जातींमध्येही उच्चनीचतेचा भेद कसा मानला जात असे, हे 'उपकाराची फेड' ही कथा दाखवते. या कथेतील चांभार स्वतःला मांगापेक्षा श्रेष्ठ मानतो व मांगाला अस्पृश्य मानतो. भारतीय समाजरचनेत अस्पृश्यता हा उच्चवर्णीय, निम्नवर्णीय व त्यांच्यापेक्षाही निम्नवर्णीय अशा स्तरांमध्ये झिरपत जाणारा जणू एक संसर्गजन्य रोगच होता. 'सापळा' या कथेप्रमाणेच ही कथासुद्धा दलितांवरील अत्याचारांविरुद्धच्या डॉ. आंबेडकरांच्या आंदोलनाचा प्रभाव व दलितांचा आत्मविश्वास वाढवण्याच्या त्यांच्या प्रयत्नांचा परिणाम चित्रित करते.

महाराष्ट्राच्या सेंट्रल जेलमध्ये अण्णा भाऊंना जे कैदी भेटले, त्यांच्यावरील कथा 'गजाआड' या संग्रहात एकत्रित केलेल्या आहेत. गरिबी आणि असहायतेमुळे गुन्हेगार बनलेल्या संवेदनशील व्यक्तींवरच्या या कथा आहेत.

इतर कुठल्याही गोष्टीपेक्षा आपले विचार सर्वात महत्त्वाचे असतात. ते माणसाने कधीही दुसऱ्याकडे गहाण ठेवू नयेत - हा 'शेरखान' या कथेचा संदेश आहे.

'काळू' ही कथा 'रानगा' या दुसऱ्या एका संग्रहात 'दारुबंदी' या शीर्षकानेही प्रकाशित झालेली आहे. या कथेत कायदा आणि सुव्यवस्था राखणारी यंत्रणा आणि दारू विक्री व्यवसायाच्या भरभराटीमधील तिचा हात यांच्यावर जहाल टीका आहे.

धाडस माणसाचे जीवन सार्थक बनवते, तर भित्रेपणा जीवनाला निराशाजनक बनवतो. त्यामुळे हे जग भेकडांसाठी नाही हे 'भेकड' ही कथा दाखवते.

'येडा नाऱ्या' ही 'नवती' या कथासंग्रहातील कथा जवळजवळ 'भेकड' या कथेसारखीच आहे. 'भेकड' प्रमाणेच 'येडा नाऱ्या' ही कथासुद्धा अति सहनशील व्यक्तीची पिळवणूक करतात असे सांगते. त्यामुळे, कुणीही आपली पिळवणूक काहीएका मर्यादेपलीकडे सहन करू नये. पिळवणूक होणाऱ्याने पिळवणूक



करणाऱ्यांविरुद्ध एकदा बंड केल्यानंतर ते त्याला गृहीत धरू शकत नाहीत. उलट, त्यांना त्याची भीती वाटते; आणि बंड करणाऱ्याला आपल्या बंडाची गोड फळे चाखायला मिळतात. या कथेत नाऱ्याच्या बाबतीतही असेच घडते.

सामाजिक अन्याय आणि मागासलेपण दूर करण्यासाठी डॉ. आंबेडकरांनी आंदोलन सुरू केले. त्या आंदोलनाच्या परिणामांच्या विविध पैलूंचे चित्रण करणारी 'वळण' ही आणखी एक कथा. डॉ. आंबेडकरांचे आंदोलन होते ते दलित आणि दलितेतर समाजातील पूर्वग्रह आणि वर्तणूक यांच्याविरुद्ध. त्यांचे आंदोलन होते ते लोकांना जे जे वाईट, अनिष्ट, अमानुष आहे आणि जातिभेद निर्माण करणारे आहे ते ते सोडून द्यायला लावण्यासाठी. या हेतूनेच त्यांनी सर्व दलितांना मेलेल्या जनावराचे मांस खाण्यासारख्या आरोग्याला अपायकारक आणि घाणेरड्या सवयी सोडून देण्याचे आवाहन केले. त्यांच्या काळच्या दलितांमध्ये या सवयी, हे 'वळण' खोल रुजलेले होते. बऱ्याच दलितांना या सवयी सोडणे अवघड वाटत होते. खरे तर हे काही अपवादात्मक नव्हते, हेच 'वळण' ही कथा दाखवते.

'जिवंत काडतूस' या कथासंग्रहातील त्याच शीर्षकाची कथा ही भारताचा स्वातंत्र्यलढा 1942 साली जेव्हा उत्कर्षबिंदूवर पोचला होता, तेव्हाच्या पार्श्वभूमीवरील आहे. अण्णा भाऊंचा मित्र असलेला नरसू स्वातंत्र्यसैनिक कसा बनला, हे सांगताना अण्णा काळामध्ये पुढे आणि मागे जातात. नरसूलाच रूपकात्मक अर्थाने 'जिवंत काडतूस' असे म्हटलेले आहे.

'जिवंत काडतूस' या संग्रहातली 'डोंगरचा राजा' हीच कथा 'सावळा मांग' या शीर्षकाने 'कृष्णाकाठच्या कथा' या कथासंग्रहातही दिसते. सावळा मांग हीच व्यक्तिरेखा 'फकिरा' या अण्णा भाऊंच्या सर्वात लोकप्रिय कादंबरीतही आढळते. इतर अनेक कथांप्रमाणेच, 'डोंगरचा राजा' ही कथासुद्धा भारताच्या स्वातंत्र्यलढ्याच्या पार्श्वभूमीवरील आहे. सावळ्या मांग आणि वारणा खोऱ्यातील खुजंगावचे त्याचे सहकारी निळू मांग, फकिरा, मुरा, पिरा, चिंचणीकर, घोंचीकर, बळी सजूरकर, भिवा आणि इतर ही या कथेतील पात्रे आहेत. भारतातील ब्रिटिश राज्याला मांगांपासून धोका होता आणि त्यांच्या बंडाची शक्यता होती. त्यांना प्रतिबंध घालण्यासाठी ब्रिटिशांनी एक कायदा करून मांग ही एक गुन्हेगार जमात म्हणून जाहीर केली. या अन्यायकारक कायद्याविरुद्ध सावळा मांग आणि त्याच्या सहकाऱ्यांनी बंड केले होते. या घटनेवरच ही कथा आधारलेली आहे. सावळ्याचे मन आणि बुद्धी यांच्या उदात्ततेचे चित्रण या कथेत केलेले आढळते.

'फरारी' या कथेचा नायक आहे शूर आणि संवेदनशील असा शिवा मांग.

आपला दुष्ट सासरा येमाजी मांग याच्याशी झालेला भांडणामुळे तो आधीच वैतागलेला असतो. त्यात गावच्या चांभाराने शिवाकडून दोन रुपये आगाऊ घेऊनही त्याच्या चपला तयार केलेल्या नसतात. त्यामुळे तो चांभाराला मारहाण करतो. त्यानंतर शिवा कशा प्रकारे फरारी होतो, तरीही त्याला अटक केली जाते, त्याच्यावर खटला भरला जातो आणि त्याला बारा वर्षांच्या तुरुंगवासाची शिक्षा सुनावली जाते. तुरुंगवास भोगून बाहेर आल्यावर त्याला दिसते की आपल्या कुटुंबाची घडी विस्कळित झालेली आहे. आपल्या कुटुंबाची घडी तो पुन्हा नीट कशी बसवतो याचे वर्णन या कथेत पुढे करण्यात आलेले आहे.

'आबी' हे दुर्दैवी आणि कष्टमय परिस्थितीतही निराश न होणाऱ्या एका ग्रामीण मुलीचे व्यक्तिचित्र आहे. ती हताश न होता तिला उपद्रव देणाऱ्यांचा धाडसीपणे बदला घेते.

'खुळंवाडी', 'कृष्णाकाठच्या कथा' आणि 'स्वप्नसुंदरी' या कथासंग्रहांतील अनुक्रमे 'रामोशी', 'सावळा मांग' आणि 'फरारी' यांच्याप्रमाणेच 'जिवंत काडतूस' या कथासंग्रहातील 'निळू मांग' हेसुद्धा मुळात नम्र असलेल्या एका धाडसी माणसाचे व्यक्तिचत्र आहे. मुळात सुसंस्कृत असलेल्या निळू मांगाला चिमाजी पाटील आणि राजू सुतारासारख्यांचा अप्रामाणिकपणा आणि हरामखोरपणा गुन्हेगार बनवतात. त्याने केलेले गुन्हे हे स्वतःच्या फायद्यासाठी केलेले नसतात, तर बेइमान माणसांना धडा शिकवण्यासाठी केलेले असतात. त्यामुळे त्याचे गुन्हे माफ केल्यानंतर तो पुन्हा कसा सभ्यपणे जगू लागतो, याचे वर्णन या कथेत केले आहे.

'निखारा' या कथासंग्रहात 'चोरांची संगत' या शीर्षकाची कथा आहे. भाऊ माळवदीकर या धाडसी माणसाचे जीवन या कथेत चित्रित करण्यात आले आहे. भाऊ माळवदीकर हा लेखकाच्या नात्यातील होता व फक्त एका रात्रीपुरते त्यांना माळवदीकरच्या संगतीत रहाण्याची संधी मिळाली होती. माळवदीकर हा एक चोर होता. केवळ पोट भरण्यासाठी त्याला हा मार्ग स्वीकारावा लागला होता. त्याचा हा संघर्ष केवळ भूक भागवण्यासाठी होता. वाचकांनी या कथेकडे मार्क्सवादी दृष्टिकोनातून पहावे अशी अण्णा भाऊंची अपेक्षा असावी असे वाटते.

'निखारा' या कथासंग्रहातील 'निखारा' या कथेत श्रीमंतांची गुंडगिरी, गरिबांची पिळवणूक आणि असहायता व पोलिसांचा भ्रष्टाचार यांचे वास्तववादी चित्रण आहे. भ्रष्टाचारात गुंतलेले असल्याने पोलीस गुन्ह्यांचा तपास करीत नाहीत. याच कथेत फुला या गरीब पण धाडसी मुलीचे चित्रण आहे. ती गरीब, श्रद्धाशील आणि प्रामाणिक अशा विठोबा डंगारणे यांची मुलगी असेत. आपल्याला आणि आपल्या



नातेवाईकांना त्रास देऊन जगणे मुश्किल करणाऱ्या गुंगाजी उर्फ गुंग्या पाटील या गावगुंडाचा ती कसा बदला घेते हेसुद्धा या कथेत दाखवले आहे.

'चिरागनगरची भुतं' हा कथासंग्रह असूनही तो कादंबरीसारखा वाटतो, कारण एका कथेतली पात्रे याच कथासंग्रहातील इतर कथांमध्येही पुन्हा येतात. यामुळे 'चिरागनगरची भुतं' ही कादंबरीसुद्धा होऊ शकली असती असे वाटते. ही 'भुतं' म्हणजे खरे तर माणसेच असतात. पण जेव्हा आपण त्यांचे जिणे पहातो, तेव्हा ती माणसांच्या रूपांतील भुतेच वाटतात. ही माणसे मुंबईमधल्या आग्रा रोड, चिरागनगर, आझादनगर अशा भागांमधल्या नरकतुल्य झोपडपट्ट्यांमध्ये रहाणारी आहेत. असहायता, गरिबी, अंधश्रद्धा, पिळवणूक, मद्यपान-वेश्यागमनासारखी व्यसने, उपेक्षा, व्यभिचार, चोऱ्यामाऱ्या या गोष्टींनी ती वेढलेली आहेत. त्यांचे जिणे पाहून अगदी भुतांनासुद्धा स्वतःची शरम वाटेल, असे अण्णा भाऊ म्हणतात. सामाजिक, राजकीय आणि आर्थिक अन्यायामुळे ही 'भुतं' वेडी झाली आहेत. ती आनंद आणि दुःख या संकल्पनांचा अर्थ बदलून जगत आहेत. तुरुंगवास, फसवणूक, खून, दरोडे हे त्यांच्या आयुष्याचे अभिन्न भाग आहेत.

'वेताळ' या कथेमध्ये राजा मोहन शेठ उर्फ फासी शेठ उर्फ आग्या वेताळ याचे व्यक्तिचित्र रेखाटलेले आहे. राजा मोहन शेठ हाच वेताळ (भुतांचा राजा) सतो. या कथेत गणादादा आणि मोहन शेठ यांच्यामधील मारामारीचे वास्तववादी चित्रण आहे.

'मानकी' या कथेत लैंगिकदृष्ट्या आक्रमक, चंचल स्वभावाच्या व सरळसरळ पूर्णपणे व्यवहारी अशा मानकी नांवाच्या स्त्रीचे चित्रण आहे. आधी तिचे बाबू चाकूवाला नांवाच्या अट्टल गुन्हेगारावर प्रेम असते. बाबू चाकूवाल्याला अटक झाल्यावर ती बाबू धावड्यावर प्रेम करू लागते.

'चंगीजखान' या कथेतील चंगीजखान हा पराकोटीचा धाडसी माणूस असतो. अफू विकणे हा त्याचा व्यवसाय असतो. दारू पिल्यानंतरच तो हा व्यवसाय करू शकतो. पोलिसखात्यातील भ्रष्टाचार आणि गैरव्यवहार यांच्याकडे ही कथा अंगुलिनिर्देश करते.

'रम्मी' या कथेतील 'रम्मी' ही एक अल्पवयीन मुलगी असते, पण दारूचा व्यवसाय करणाऱ्या जगाने तिला विश्वास बसू नये, इतके धाडसी, चलाख आणि कावेबाज बनवलेले असते. ती देशी दारूचे दुकान चालवत असते. ती जरी अल्पवयीन असली, तरी आपल्या दुकानात दारू पिण्यासाठी आलेली गिऱ्हाइके दारू पिऊन लास झाली, की त्यांच्या अंगावरील अंगठ्या, गळ्यातील सोन्याच्या

साखळ्या आणि मनगटी घड्याळे चोरण्यात पक्की उस्ताद झालेली असते.

'काळे मास्तर' या कथेतील काळे मास्तर हे अट्टल दारूबाज आहेत. त्यांचे जीवन उद्ध्वस्त झालेले आहे. त्यांच्या बायकोने त्यांना सोडून दिलेले असल्याने ते मद्यपानाकडे वळलेले आहेत.

'अडीच आंधळे' या कथेत, पूर्णपणे आंधळे असलेले भिकारीसुद्धा भीक मागून मिळालेल्या पैशांची दारू कशी पितात, हे दाखवले आहे. ते आंधळे असले, तरी मारामाऱ्यासुद्धा करतात. एका शांतताप्रिय, नजर कमजोर असलेल्या चष्मेवाल्या माणसाला दोन आंधळ्यांच्या मारामारीमुळे कसा त्रास होतो, हेसुद्धा या कथेत सूचित केलेले आहे.

'येसू' या कथेतील येसू हा दारूची ने-आण करून आपल्या जीवनाला आकार देण्याचा प्रयत्न करीत असतो. तारा ही त्याची प्रेयसी असते. तिचे दुसऱ्याही एका तरुणाबरोबर प्रेमप्रकरण चालू असते. ती येसूविरुद्ध पोलिसात तक्रार नोंदवण्यापर्यंत जाते.

'गेंडा' ही एका झोपडपट्टीच्या पार्श्वभूमीवरील कथा झोपडपट्टीतील वास्तवाचे चित्रण करते. गेंडा हा प्राणी डोक्याने धडक देण्यासाठी जसा प्रसिद्ध आहे, तसाच या कथेतील सखाराम सकट हासुद्धा आपल्या डोक्याने लोकांना धडक देण्यासाठी प्रसिद्ध असतो. म्हणूनच त्याला लोक 'गेंडा' म्हणत असतात. पण अशा रासवट इसमाचे लग्न विमल नांवाच्या सुंदर तरुणीशी होते, हा नियतीने केलेली विमलची थट्टाच!

'परमू' ही कथा परमू नावाच्या एका दारुड्या वायरमनच्या आयुष्याच्या दशेचे चित्रण करते. परमूचे इब्राहिमबरोबरचे भांडण, एका वडाराच्या खुनावरून परमूची अटक, नंतर तो वडार जिवंत असल्याचे समजणे, परमूची मुक्तता होणे व भांगेच्या सेवनामुळे परमूची दशा-दशा होणे या घटना कथेमध्ये कधी पुढे रंगवण्यात आल्या आहेत.

'भुतांचा शिमगा' या कथेत होळीभोवती भुतांनी बॉंब कशी मारली याचे चित्रण आले आहे.

'मेलेला लखपती' ही एक विनोदी कथा आहे. 'लखपती' म्हणून ओळखला जाणारा हा माणूस प्रत्यक्षात लखपती नसतो. खरे तर तो इतका गरीब असतो, की जगण्यासाठी त्याला दगड फोडण्याचे काम करावे लागत असते. परंतु, त्याच्या गरीबीची थट्टा करण्यासाठी लोग गमतीने त्याला 'लखपती' म्हणत असतात. चिरागनगरमधल्या बऱ्याचशा 'भुतां'प्रमाणे हा 'लखपती' सुद्धा दारुडा असतो.



होळीच्या दिवशी प्रमाणाबाहेर दारू पिल्यामुळे तो होळीजवळ मेल्याप्रमाणे पडतो. तो मेला आहे असे समजून काही 'भुते' होळीच्या अग्नीतचत त्याचे दहन करायचे ठरवतात. पण जाळला जाण्याच्या बेतात सतानाचा त्याला शुद्ध येते आणि इतरांप्रमाणेच तोही बोंब मारू लागतो.

'भुतांची धुळवड' या कथेत ही 'भुतं' धुळवड कशा भयानक प्रकारे साजरी करतात याचे चित्रण आहे. अंतोन आणि पेंटर ही दोन 'भुतं' दारू चढलेल्या अवस्थेत घोड्यावर बसून पोलिस स्टेशनवर जातात आणि तिथल्या पोलिस-इन्स्पेक्टरला सॅल्यूट ठोकतात. ही धाडसी कृती ते करतात याचे कारण ते साहसी असतात हे सते; तर याचे कारण असते त्यांना चढलेली दारू. दारूच्या धुंदीत ते नाचही करतात.

## कलात्मक आणि विनोदी कथा

अण्णा भाऊंकडे एक दलित लेखक, एक उपेक्षित व अशिक्षित लेखक, ग्रामीण जीवन, झोपडपट्टीतील जीवन चित्रित करमारा लेखक आणि वर्गभेदाची जाणीव असलेला व समाजवादाचा प्रचार-प्रसार करणारा लेखक असा विविध दृष्टीकोनांतून पाहिले जाते.

असे असले, तरी त्यांच्या कलात्मक कथा त्यांना लावली जाणारी सर्व लेबले व्यर्थ ठरवतात. वरीलपैकी एकाही वैशिष्ट्याचा अतिरेक त्यांच्या पूर्वग्रहरहित अशा कलात्मक कथांमध्ये दिसत नाही. या कथा त्यांच्यमधील मध्यममार्गी लेखकाचे दर्शन घडवतात व वाचकांची मने जिंकतात. या कथा त्यांच्या विविध पैलू असलेल्या प्रतिभेतून आणि सूक्ष्म निरीक्षणातून जन्मलेल्या आहेत.

अण्णा भाऊंचा विनोद वाचकांना सुन्न करतो. आपल्या जीवनातील दुःख, दारिद्र्य, असहायता आणि अस्थिरता यांची तमा न बाळगता जगणाऱ्या माणसांच्या जीवनातून हा विनोद निर्माण झाला आहे. या कथांचा आढावा या विभागात घ्यायचा आहे.

'शिकार' या कथेत एका संस्थानिकाच्या शिकारीच्या मोहिमेचे चित्रण आहे. हा संस्थानिक शिकारीला जातो. हाकाऱ्यांनी त्याच्यासमोर आणलेल्या रानडुकरांना मारायला जाताना अनेकदा नेम चुकतो. रानडुकरांना मारण्यासाठी जेव्हा तो रायफल उचलतो, तेव्हा तिच्यात काडतुसेच नाहीत असे त्याच्या लक्षात येते. संपूर्ण दिवस घालवूनसुद्धा त्याला एकही शिकार मिळत नाही. शेवटी दुसऱ्या कुणीतरी मारलेली रानडुकरे तो आपण केलेली शिकार म्हणून मिरवण्यासाठी आपल्या वाड्यावर नेतो.

'कृष्णाकाठच्या कथा' मधील 'अमृत' ही कथा जुन्या वैदूंच्या आपली औषधे गुप्त राखण्याच्या वृत्तीची थट्टा करते. अमृत हे एक पौराणिक पेय - ते जी व्यक्ती प्राशन करते, ती अमर होते असा समज आहे. पण 'अमृत' या कथेतील अमृत म्हणजे सर्पदंशावर रामबाण उपाय ठरणाऱ्या, विष उतरवणाव्या 'आराटी' या जंगली झुडुपाच्या मुळ्यांचा रस. निवेदकाच्या 'जिवा' नांवाच्या मित्राला हे औषध माहीत असते, पण निवेदकाने कितीही पिच्छा पुरवला, तरी ते औषध कोणते याचा काही जिवा पत्ता लागू देत नसतो. अतिशय मजेशीर निवेदनातून व संवादांतून लेखकाने ही कथा फुलवली आहे.

एका गावातील एकमेकांविरुद्ध असलेले गट रामलीला सादर करताना रामायणातील राम-रावण युद्धाचा प्रसंगाचा उपयोग एकमेकांचा बदला घेण्यासाठी कसा करून घेतात, याचे 'राम-रावण युद्ध' या कथेत विनोदी अंगाने चित्रण करण्यात आले आहे.

'गुऱ्हाळ' या संग्रहातील 'खोड' ही कथा बबन्या या अतिशय खोडसाळ अशा मुलाची गोष्ट आहे. बबन्या हा रामू आणि लक्ष्मी ढमाले यांचा मुलगा. बबन्याचा खोडसाळपणा हा खलनायकाच्या पातळीवर जाणारा आहे, कारण तो आपल्या खलप्रवृत्तीच्या बापाचे अंधानुकरण करीत असतो. इतरांचे अंधानुकरण करण्याचे घातक परिणाम या कथेत चित्रित करण्यात आले आहेत.

'पैलवानांचा गाव' ही 'निखारा' या संग्रहातील कथा या गावाने वाद मिटवण्यासाठी स्वीकारलेल्या एक विनोदी निर्णयाचे चित्रण करते. अण्णा भाऊंच्या कथांतील इतर खेड्यांप्रमाणे या कथेतील खेड्यामध्येसुद्धा एकमेकाविरुद्ध असलेले दोन गट आहेत - खंडू चव्हाण याच्या नेतृत्त्वाखालील चव्हाणांचा गट, तर रामजी खोताच्या नेतृत्त्वाखालील खोतांचा गट. चव्हाण आणि खोत यांच्या मुलींवरून या दोन गटांमध्ये एकदा वाद सुरू होतो. तेव्हा या दोन गटांपैकी वरचढ कोण आहे हे ठरवण्यासाठी एकजण एक गमतीशीर मार्ग सुचवतो. तो मार्ग असाः चव्हाणांच्या गटातील सर्व पुरुषांनी खोतांच्या गटातील आपापल्या वयाच्या पुरुषांशी कुस्त्या करावात, आणि ज्या गटातील विजयी पहिलवानांची संख्या अधिक असेल, तो गट वरचढ म्हणून जाहीर केला जावा. या विनोदी निर्णयामुळे अनेक हास्यकारक प्रसंग उद्‌भवतात.

'मचका' ही 'निखारा' या संग्रहातील कथा. बोटाऱ्याची वाडी या गावातील गावकरी आपल्या गावात जत्रा भरवण्याचे ठरवतात, पण पुरेशी वर्गणी न जमल्याने त्या योजनेचा 'मचका' (पचका, बोऱ्या) होतो, आणि ती योजना कायमची निकालात काढली जाते.



## दुःखान्त कथा

विनोदी कथांबरोबरच अण्णा भाऊंनी हृदयद्रावक अशा दुःखान्त कथासुद्धा लिहिलेल्या आहेत. या दुःखान्त कथांपैकी महत्त्वाच्या कथा म्हणजे 'टिळा लावते मी रक्ताचा', 'डोळे', 'जखम', 'कोकिळा', 'स्मशानातील सोनं', 'प्रायश्चित्त' आणि 'भिवा रामोशी'. (या कथांपैकी 'टिळा लावते मी रक्ताचा' या कथेवरच अण्णा भाऊंनी नंतर 'आवडी' ही कादंबरी लिहिली.)

आपल्याकडून नकळत गोत्रगमन होऊन नैतिकतेचा भंग झाल्याने चार व्यक्ती प्रायश्चित्त म्हणून कशा प्रकारे आत्महत्त्या करतात, याचे चित्रण 'बरबाद्या कंजारी' या कथासंग्रहातील 'प्रायश्चित्त' या कथेत येते.

'रेडं झुंज' हीसुद्धा 'बरबाद्या कंजारी' या कथासंग्रहातीलच कथा. उत्तर प्रदेशातून मुंबईत दुधाचा व्यवसाय करण्यासाठी आलेल्या सुकर्ण आणि बाबालाल या दोन भैय्यांमधील व्यावसायिक आणि भांडवलदारी स्पर्धेचे चित्रण या कथेत आहे. या स्पर्धेमुळे हे दोघेजण एकेक रेडा पाळतात. आपल्या रेड्यांच्या माध्यमातून एकमेकांचा पराभव करण्याचा त्यांचा विचार असतो. या हेतूने ते या रेड्यांची झुंज लावतात - तीही एका लाकडी पुलावर! हे रेडे इतक्या जोराने झुंजतात, की त्यांच्या हालचालींमुळे आणि वजनामुळे तो लाकडी पूल मोडतो, दोन्ही रेडे खालून वहात असलेल्या नदीतील खडकावर आपटतात आणि जागच्या जागी मरून जातात.

'दुर्दैवी' ही कथा 'नवती' या संग्रहातील आहे. सयाजीराव भोसले हा एक सालस आणि प्रामाणिक माणूस असतो. बाळा चौगुले आणि त्याची पत्नी हे दुष्ट प्रवृत्तीचे असतात. ते दोघे सयाजीराव भोसलेच्या मुलांना आणि सुनांना सयाजीरावविरुद्ध फितवतात. चौगुले पति-पत्नी सयाजीराव भोसलेचे सुखी आयुष्य कशा पद्धतीने विस्कटून टाकतात, याची ही कथा आहे.

## आत्मचरित्रात्मक कथा

अण्णा भाऊंच्या कथासंभारातील एक आकर्षक विभाग म्हणजे त्यांनी लिहिलेल्या आत्मचरित्रात्मक कथा. अर्थात् अशा कथा संख्येने कमी आहेत. या

कथांमधून आपल्याला अण्णा भाऊ एक माणूस म्हणून कसे होते हे दिसते. त्यांची जीवनशैली, धाडस, उदात्तता, त्यांनी केलेले त्याग, त्यांचा प्रामाणिकपणा, जिद्द, नैतिकता, प्रेमळपणा, निर्णय घेण्याची त्यांची पद्धत यांचे दर्शन होते. आपल्या लेखनशैलीबद्दल अण्णा भाऊंनी म्हटले आहेः "मला माणसं खूप आवडतात. त्यांना विद्रूप करणं मला आवडत नाही. जे मी स्वतः जगलो आहे, पाहिलं आहे आणि अनुभवलं आहे, तेच मी शब्दांत मांडण्याचा प्रयत्न केला आहे. माझ्या साहित्यातील बऱ्याचशा व्यक्तिरेखा मला प्रत्यक्षात भेटलेल्या आहेत. माझ्या लेखनातील अनेक व्यक्तिरेखा खऱ्या आहेत."[3]

'लाडी' या कथासंग्रहातील 'संकट' या कथेत निवेदक आपल्या धूम्रपानाच्या व्यसनामुळे कसा संकटात सापडतो हे दाखवले आहे. गावातील इतर गुराख्यांबरोबर तो आपली गाय चारण्यासाठी घेऊन जात असतो, तेव्हा त्याला हे व्यसन लागते.

'आबी' या कथासंग्रहातील 'डोळे' ही एका तरुणीची शोकात्मकथा आहे. मानेवाडीच्या गीता या विवाहित तरुणीचे डोळे खूप सुंदर असतात. ती सुंदर असल्याने तिच्या नवऱ्याला तिच्या चारित्र्याबद्दल संशय असतो, या संशयापोटी तिचा नवरा आणि सासरचे लोक तिचा खूप छळ करीत असतात. एके दिवशी ती आपले सासर सोडून आपल्या माहेरी येते, आणि जाणूनबुजून आपल्या डोळ्यांत विष घालते. तिची दृष्टी जाते. आपले सुंदर डोळे हेच आपल्या जीवनातील त्रासाला आणि नवऱ्याच्या संशयाला कारणीभूत आहेत असे वाटल्याने ती ही अघोरी कृती करते.

'कृष्णाकाठच्या कथा' या संग्रहातील 'शिकार' ही कथा, एक संस्थानिक साधी एका रानडुकराची शिकार करण्यातही असमर्थ असतो यावर टीका करणारी असली, तरी ती आत्मचरित्माकही आहे. या कथेतील गंगाराम माहूत हा अण्णा भाऊंचा मित्र होता, आणि गंगारामनेच त्यांना महाराजांच्या नेतृत्त्वाखाली जाणार असलेल्या शिकारीच्या मोहिमेत बरोबर नेले होते.

## गुन्हेगारी जीवनाचे चित्रण करणाऱ्या कथा

मराठी साहित्यात गुन्हेगारी प्रवृत्तीच्या व्यक्तिरेखा खलनायक म्हणूनच आल्या

3 : साठे, अण्णा भाऊ, प्रस्तावना, 'बरबाद्या कंजारी' (विद्यार्थी गृह प्रकाशन, पुणे 1960).



आहेत. परंतु या व्यक्तिरेखा आणि त्यांच्याशी संबंधित घटना केंद्रस्थानी ठेवून त्यांच्यावर कथा लिहिण्याच्या कौशल्यात अण्णा भाऊंची बरोबरी करणारे लेखक विरळाच.

'खुळंवाडी' संग्रहातील 'मेंढा' या कथेतल्या सांगावच्या लखूजी माने याने एक मजबूत आणि लढाऊ मेंढा पाळलेला असतो. हा मेंढा लखूजीच्या आक्रमक स्वभावाचे जिवंत प्रतीक म्हणूनच येतो. हा मेंढा त्याच्या लढतीसाठी आणि दमासाठी प्रसिद्ध असतो. पण तो कुणीतरी चोरून नेतो. आपला मेंढा कुणी बरे चोरला असेल असा विचार करताना लखूजीला वाटते, की माणगांवच्या पंढरी पाटील या आपल्या प्रतिस्पर्ध्यानेच तो चोरला असावा. त्यामुळे पंढरीच्या या दुष्कृत्याचा बदला घेण्यासाठी लखूजी पंढरीचा मेंढा मारतो, आणि पुन्हा याचा बदला घेण्यासाठी पंढरीची माणसे लखूजीचा खून करतात.

'गजाआड' संग्रहातील 'तरस' या कथेत अनेक स्त्रियांवर बलात्कार करणाऱ्या, तरसासारख्या एका माणसाचे चित्रण आहे. त्याच्या शरीरामध्ये व्यंग असल्याने तो एखाद्या तरसाप्रमाणेच चालत असतो. शिवाय त्याचे वागणेसुद्धा एखाद्या तरसाप्रमाणेच असते.

वास्तव जसे अनुभवले, तसेच चित्रित करण्याच्या अण्णा भाऊंच्या धोरणामुळे ते गुन्हेगार महिलांचे चित्रण करण्यातही मागेपुढे पहात नाहीत. उदाहरण म्हणून 'हौशी' ही कथा घेता येईल. या कथेत लख्या बारपुत्याच्या हौशी या चंचल मनोवृत्तीच्या आणि सारासार विवेक नसलेल्या प्रेयसीचे चित्रण आहे. लख्या या आपल्या प्रियकरासाठी हौशी आपल्या पतीचा खून करते. त्यामुळे तिला अटक होते. कैदेतून सुटल्यावर ती लख्याला विसरते आणि राजा नांवाच्या तरुणाबरोबर पळून जाते. अशा या बेलगाम तरुणीचे चित्रण या कथेत केलेले आहे.

'रानगा' या कथासंग्रहातील 'दारुबंदी' ही कथासुद्धा गुन्हेगारी जीवनाचे चित्रण करणारी आहे. हीच कथा 'गजाआड' या संग्रहात 'काळू' या शीर्षकाने प्रकाशित झालेली दिसते. काळू, काळूची प्रेयसी फातमा आणि काळूचा प्रतिस्पर्धी अकबर अशा तीन अट्टल गुन्हेगारांच्या गन्हेगारी कृत्यांचे चित्रण या कथेत दिसते.

'आबी' या संग्रहातील 'आडवा आक्या' या कथेचा नायक आहे भिकारवाडीचा आक्या. आक्याचे आचार आणि विचार गावकऱ्यांच्या आचार-विचारांच्या अगदी विरुद्ध असे असतात. त्यामुळे गावातील लोक त्याला 'आडवा आक्या' असे म्हणत असतात. आक्याने तीन प्राणी पाळलेले असतात - एक कुत्रा, एक गाय व एक बैल. हे सारे प्राणी त्यांच्या मालकाप्रमाणेच उपद्रवी आणि त्रासदायक असतात.

त्यामुळे सारा गाव वैतागतो आणि आक्याला व त्याच्या 'प्रिय' प्राण्यांना धडा शिकवतो.

'हिकमत' ही 'गुऱ्हाळ' या संग्रहामधील कथा रावजी राघोजी (रामोशी) आणि रघू ठोमरे हे गावकऱ्यांची कशी फसवणूक करतात, याचे चित्रण करते. लोकांना नकली सोने देऊन आपले खरे सोने शाबूत ठेवण्यासाठी गावच्या देशमुखाने या दोघांना नोकरीला ठेवलेले असते. ते अनेकांची फसवणूक करतात. सर्वसामान्य खेडुतांचे अज्ञान आणि त्याचा धूर्त लोकांनी घेतलेला फायदा या कथेत दाखवला आहे.

'गधडा भिक्या' ही 'गुऱ्हाळ' या संग्रहातील कथा भिक्या अरपाट नांवाच्या एका उद्धट, विकृत आणि बेजबाबदार माणसाबद्दलची आहे. तो गाढवासारखा मूर्खपणाने वागत असल्याने त्याला गावकरी 'गधडा' म्हणत असतात. काही दिवसांनंतर गावच्या जत्रेत भिक्याची त्याचा शत्रू सदू नाईकडा याच्याशी मारामारी होते. सदू या मारामारीत भिक्याचा जीव घेतो.

'हेड्या हैबती' ही 'गुऱ्हाळ' संग्रहातील कथा हैबती या हेड्याचे व्यक्तिचित्र आहे. हेडा म्हणजे गुरांच्या बाजारातील दलाल. इतरांना फसवण्यावरच त्याचा व्यवस्या चालतो. गुरांच्या बाजारात दलाल म्हणून काम करून तो विक्रेता आणि ग्राहक अशा दोघांकडूनही दलाली कमावतो. आपल्या या व्यवसायासाठी तो खोटे बोलायलाही कचरत नाही. प्रत्यक्षात तो एका फडक्यात बांधलेल्या वहाणांच्या जोडावर हात ठेवून शपथ घेतो, पण बोलताना मात्र 'भाकरीवर हात ठेवून शपथ घेतोय्' असे सांगतो,

'घोडगोंधळ' ही 'गुऱ्हाळ' संग्रहातील कथा दोन बायकांच्या नवऱ्याचे व्यक्तिचित्र आहे. दोघीही त्याला त्रास देत असतात. त्यांना सरळ करण्यासाठी त्याला हिंसक आणि आक्रमक मार्गाचा अवलंब करावा लागतो. जिथे स्त्रियांवर फक्त हिंसा आणि धमक्या यांच्या सहाय्यानेच नियंत्रण ठेवता येते, अशा ग्रामीण जीवनाचे चित्रण या कथेत केलेले आढळते.

'हुबळवाडीची भानगड' या 'नवती' या संग्रहातील कथेत गुन्हेगारीच्या टोकावर पोचलेल्या व्यक्तिरेखांच्या कारवायंचे चित्रण आढळते.

'दे. भ. चं भूत' ही 'ठासलेल्या बंदुका' या कथासंग्रहातील कथा 1942 सालच्या भारतीय स्वातंत्र्यलढ्याच्या पार्श्वभूमीवरील आहे. भुतासारखा दिसणारा महादेव (गावकरी तुच्छतेने त्याला 'महाद्या' म्हणत) आणि अण्णा थोरात हे गावकऱ्यांना घाबरवून आपला मतलब साधण्यासाठी स्वातंत्र्यलढ्याची संधी



वापरतात. व्यापक अर्थाने विचार केला, तर स्वातंत्र्यलढ्याचा वापरसुद्धा काही लोकांनी स्वार्थ साधण्यासाठी करून घेतला. ते लोक खऱ्या अर्थाने देशभक्त नव्हते, तर या भुतांप्रमाणे नकली देशभक्त होते, असे दिसते.

'इरेनं गाढव खाल्लं' या 'कृष्णाकाठच्या कथा' या संग्रहातील कथेत अवाजवी गर्व असलेल्या तुका नांवाच्या एका माणसाचे चित्रण आहे. त्यामुळे तो स्वतःचे आणि इतरांचे जीवन उद्ध्वस्त करतो. तो स्वतः अशिक्षित असूनही एका सुशिक्षित पत्नीमुळे त्याला न्यूनगंड वाटू लागतो. पण हा न्यूनगंड लपवण्यासाठी तो आपल्या पत्नीला मारहाण करू लागतो. शेवटी तो आपले कौटुंबिक, सामाजिक आणि आर्थिक जीवन उद्ध्वस्त करून घेतो, कारण त्याची पत्नी त्याला कायमची सोडून जाते.

'चिरागनगरची भुतं' मधील 'गेंडा' या कथेत लोकांना आपल्या डोक्याने गेंड्यासारख्या धडका देणाऱ्या एका अतिशय रासवट आणि बेपर्वा माणसाचे व्यक्तिचित्र आहे. या धाडसामुळेच तो सुकड्या, नानको आणि आबऱ्या या तीन गुंडांना बेदम मारतो, कारण त्याने हस्तक्षेप केला नसता, तर एका झोपडपट्टीतील विमल नांवाच्या एका असहाय मुलीवर त्यांनी नक्कीच बलात्कार केला असता. 'गेंडा' तिच्या मदतीला येऊन तिच्या जारित्र्याचे रक्षण करतो. शेवटी गेंडा आणि विमल यांचे लग्न होते.

## अंधश्रद्धांविरुद्धच्या कथा

अण्णा भाऊंच्या एकूण कथांपैकी बऱ्याच कथांना अंधश्रद्धांविरुद्धच्या कथा म्हणता येईल. या गटात येणाऱ्या कथा म्हणजे 'तीन भाकरी', 'बोलकं मुंडकं', 'भुतांचा वाडा', 'सूड', 'चालतं मढं' आणि 'मरीआईचा गाडा' यांच्यासारख्या कथा. अण्णा भाऊ हे वैज्ञानिक दृष्टी असलेले लेखक होते असे या कथा सूचित करतात.

'मरीआईचा गाडा' या 'कृष्णाकाठच्या कथा' या संग्रहातील कथेत जीवनाबद्दलचा प्रामाणिक, वैज्ञानिक आणि नवा दृष्टिकोन कशा प्रकारे जुन्या, अशास्त्रीय व अंधश्रद्धेवर आधारित दृष्टिकोनावर विजय मिळवतो हे दाखवले आहे. या कथेतील नाना हे शास्त्रीय दृष्टिकोनाचे प्रवक्ते आहेत; तर सटवाजी, केरू नलावडा, भाऊ बाबाजी आणि म्हादबा हे जुन्या, अशास्त्रीय आणि अंधश्रद्धेवर आधारलेल्या दृष्टिकोनाचे प्रतिनिधित्व करणारे आहेत. नाना ही व्यक्तिरेखा

ब्रिटिशांविरुद्ध बंडखोरी करणारे क्रांतिसिंह नाना पाटील यांच्यावर आधारलेली आहे असे म्हटले जाते. क्रांतिसिंह नाना पाटील हे महाराष्ट्रातील प्रसिद्ध कम्युनिस्ट नेते होते. मरीआई नांवाची एक देवी कॉलरा वगैरे रोगांच्या साथी सुरू करते. तिला शांत करण्यासाठी तिची पूजा करून तिचा गाडा शेजारच्या धावच्या हद्दीत सोडल्यास त्या साथी आपल्या गावातून शेजारच्या गावात जातात, अशी एक अंधश्रद्धा महाराष्ट्रात प्रचलित होती. मरीआईसंबंधीच्या समजाचे समर्थन करणाऱ्यांचे मुद्दे कसे निरर्थक आहेत हे या कथेतील नाना स्पष्ट करतात. शेवटी हा अर्थहीन रिवाज चालू ठेवणे हा मूर्खपणा आहे हे लोकांना पटवून देण्यात नाना यशस्वी होतात.

## प्रेमकथा

अण्णा भाऊंच्या कादंबऱ्यांप्रमाणेच त्यांनी लिहिलेल्या प्रेमकथांनाही वर्ग-जाणिवेचा स्पर्श आहे.

'कोकिळा' ही एका निष्पाप प्रेमाची दुःखान्त कथा आहे.

'वेडा वारा' ही एकूणच मराठी कथा-साहित्यात आपल्या वेगळेपणामुळे उठून दिसणारी कथा आहे; कारण मराठी साहित्यातील बहुतेक कथांमधील विवाहित तरुणी सासरहून माहेरी पळून जातात; परंतु 'वेडा वारा' मधील विवाहित तरुणी गंगू याच्या अगदी उलट वागते. पतीच्या प्रेमासाठी व्याकुळ झालेली गंगू माहेराहून सासरला पळून येते.

'राणी' या कथेत भाऊ पैलवान, मारुती रामोशी आणि राणी असा प्रेमाचा त्रिकोण आहे. भाऊ पैलवान आणि राणी यांचे एकमेकांवर प्रेम आहे. मारुतीच्या उद्धटपणामुळे भाऊ पैलवानाकडून त्याचा खून होतो. राणी आणि भाऊ पैलवान हे एकमेकांच्या इतके प्रेमात असतात, की खुन्याला पकडण्याची वेळ येते, तेव्हा भाऊ आणि राणी दोघेही एकमेकांना पुढील त्रासापासून वाचवण्यासाठी खुनाचा आरोप आपल्यावर घेऊ पहातात.

'तमाशा' ही बापू आणि त्याच्या दोन प्रेयसी गोजा आणि नवटाक यांच्यामधील आदर्श प्रेमाची कहाणी आहे. एरवी एकाच पुरुषावर प्रेम करीत असलेल्या दोन स्त्रिया एकमेकींचा मत्सर करतात, पण गोजा आणि नवटाक या मात्र तसा मत्सर करीत नाहीत. बापूवर आपला एकटीचाच हक्क प्रस्थापित करण्याचा प्रयत्न गोजा किंवा नवटाक करीत नाहीत.

'रंभा' या कथेतील रंभा ही एक सुंदर ग्रामीण तरुणी आहे. ती मीरा नांवाच्या



देखण्या तरुणाच्या प्रेमात पडते. 'मीरा' हा पुरुष असूनही तमाशात नाच्याची भूमिका करीत असतो. रंभा ही मीराच्या पिळदार शरीरामुळे त्याच्याकडे आकर्षित झालेली असते. त्याच्याबद्दलचे तिचे प्रेम इतके उत्कट आणि पक्के असते, की वेळ आल्यावर ती आपले घर आणि आपले आईवडील यांना सोडून त्याच्यामागे जाते.

'मंजुळा' या कथाची नायिका मंजुळा शूर आहे. आपल्या प्रियकरासाठी आपल्या वडिलांवर आणि इतर नातेवाईकांवरही कुऱ्हाडीने वार करायला ती मागेपुढे पहात नाही. याउलट तिचा प्रियकर शिलाजी हा समर्थ तरीही समतोल असतो.

'बिलवरी' ही कथा बिलवरी आणि अमीन यांच्यातील प्रेमाची कथा आहे. अमीन हा श्रीमंत अशा देशमुखांच्या पदरी काम करणारा एक गरीब कामगार असतो. या कथेतील सर्वात आकर्षक असे भाग म्हणजे - देशमुखाने देऊ केलेली प्रचंड संपत्ती बिलवरीने नाकारणे; देशमुखाचा विरोध असूनही बिलवरीने अमीनवर प्रेम करीत रहाणे; त्यामुळे आपले, आपल्या वडिलांचे व आपल्या जमातीचे जीवन धोक्यात घालणे, पण अमीनला धोका न देणे.

'पिला' ही 'पिला' नांवाची कोळी समाजातील एक स्त्री आणि उत्तम नांवाचा एक सुशिक्षित कुंभार यांच्यामधील प्रेमाची कथा आहे. पिला आंधळी होते व उत्तमला वायुसेनेत नोकरी मिळते, तरी त्यांच्यातील प्रेमाचे बंधन कायम रहाते.

'मानकी' ही 'चिरागनगरची भुतं' या संग्रहातील कथा प्रेमाची एक वेगळीच छटा दाखवते. दादू धावडा आणि बाबू चाकूवाला या आपल्या दोन प्रेमिकांपैकी एकाशीही मानकी एकनिष्ठ नसते. प्रियकर निवडण्यासाठी तिचा निकष असतो त्याचा धाडसीपणा. ती तुरुंगात गेल्यावर आपला पहिला प्रेमिक बाबू चाकूवाला याच्याकडे पाठ फिरवते व दादू धावडा याच्यावर प्रेम करू लागते.

'बोलकं मुंडकं' ही कथा प्रेमभंगामुळे उद्ध्वस्त आणि वेडा झालेल्या एका तरुणाची कथा आहे. पिऱ्या हा तरुण गुणी नांवाच्या सुंदर मुलीच्या प्रेमात पडतो, पण त्याचे प्रेम यशस्वी होत नाही. त्यामुळे तो 'ताऱ्या' नांवाचं वाद्य वाजवीत, वेगवेगळ्या प्राण्या-पक्षांचे आवाज काढीत गावात भीक मागत फिरू लागतो. गावातली पोरेसोरे त्याची थट्टा करू लागतात, त्याला दगड मारू लागतात. यामुळे वैतागून, दगडांचा त्रास वाचवण्यासाठी पिऱ्या नदीकाठच्या वाळवंटात आपले मानेपर्यंतचे शरीर पुरून घेतो. गावकऱ्यांना जेव्हा वाळूतून वर आलेले फक्त एक मानवी मुंडके तेवढे दिसते, आणि ते बोलते आहे हे त्यांच्या लक्षात येते, तेव्हा ते त्याला 'बोलकं मुंडकं' असे म्हणू लागतात.

'फरारी' ही जशी शौर्यकथा आहे, तशीच प्रेमकथाही आहे. शिवा आणि

त्याची बायको येसू यांच्यामधील प्रेमाची ही कथा आहे.

## कौटुंबिक जीवनावरील कथा

या प्रकारात मोडणाऱ्या अण्णा भाऊंच्या कथांपैकी सर्वांत महत्त्वाच्या कथा म्हणजे 'पाझर' आणि 'दाभाड्यांचा वाद'.

'पाझर' ही कथा स्त्रीच्या हृदयाला मायेचा पाझर कसा फुटतो याची कथा आहे. एक गोड मूल तिला स्वतःची आई मानते, तेव्हा तिला मायेचा पाझर फुटतो. ते मूल खूप लहान असतानाच त्याची आई दिवंगत झालेली असते.

कुटुंबियांमधील मायेचे चित्रण 'दाभाड्यांची वाद' या 'गुऱ्हाळ' या कथासंग्रहातील कथेत सापडते. दाभाडे कुटुंबातील थोरला भाऊ जिजाबा दाभाडे आणि धाकटा भाऊ हणमा दाभाडे हे अगदी लहानसहान गोष्टींवरून वाद घालीत असतात - आईची काळजी घेणे, जिजाबाच्या बकरीने हणमाच्या सगळ्या भाकरी खाणे, घरांवर कौले घालणे, हणमाच्या कुत्र्याने जिजाबाच्या भाकरी पळवणे अशा लहानसहान गोष्टींवरून ते वाद घालीत असतात. पण जेव्हा हणमाला पोलीस अटक करणार आहेत असे जिजाबाला समजते, तेव्हा हणमाच्या सगळ्या चुका माफ करून तो त्याच्या बाजूने उभा रहातो आणि त्याला वाचवतो.

अगदी थोडे अपवाद वगळता मराठीतील बहुतेक समीक्षकांनी अण्णा भाऊंनी मराठी कथेला दिलेल्या योगदानाकडे दुर्लक्षच केले आहे. असे असले तरी, डॉ. एस. एस. भोसले हे अण्णा भाऊंच्या लेखनाकडे योग्य परिप्रेक्ष्यातून पहाणाऱ्या समीक्षकांपैकी प्रमुख समीक्षक आहेत. अण्णा भाऊंनी मराठी कथेला दिलेल्या योगदानाचे सविस्तर असे खरेखुरे मूल्यांकन जाणून घ्यायचे असेल, तर डॉ. भोसले यांनी संपादित केलेल्या अण्णा भाऊंच्या प्रातिनिधिक कथांच्या संग्रहाला त्यांनी (डॉ. भोसले यांनी) लिहिलेली वीस पृष्ठांची प्रस्तावना वाचायला हवी. या प्रस्तावनेत एके ठिकाणी डॉ. भोसले लिहितात, 'फुले-आंबेडकरांचा वारसा घेऊन उभे राहिलेले, मराठी साहित्य-संस्कृतीची परंपरा न नाकारणारे अण्णा भाऊ हे पहिले दलित बंडखोर लेखक झाले...'[4] याच संदर्भात प्रख्यात मराठी कवी नारायण सुर्वे यांनी अण्णा भाऊंचे जीवन आणि साहित्य यांचे मूल्यांकन करणारा, 'युगांतर' या साप्ताहिकाच्या 1969 सालच्या अण्णा भाऊ - अमर शेख विशेषांकात लिहिलेला लेखही वाचण्यासारखा आहे.

उत्तम दर्जाच्या कथांबरोबरच अण्णा भाऊंनी साधारण दर्जाच्या कथाही बऱ्याच लिहिल्या. या कथा परिणामहीन, कृत्रिम आणि उथळ वाटतात. कधी-कधी त्याच-त्याच व्यक्तिरेखा पुन्हा-पुन्हा वेगवेगळ्या कथांमध्ये आणि कादंबऱ्यांमध्ये येतात. उदाहरणार्थ, निळू मांग, सावळा मांग आणि विष्णुपंत कुलकर्णी यांच्यावर अण्णा भाऊंनी स्वतंत्र अशा वेगवेगळ्या कथा लिहिलेल्या असूनही याच व्यक्तिरेखा त्यांच्या 'फकिरा' या प्रख्यात कादंबरीतही आल्या आहेत. किंवा, दुसरे उदाहरण द्यायचे झाले, तर 'टिळा लाविते मी रक्ताचा' या कथेच्याच विषयावर आणि त्या कथेतीलच व्यक्तिरेखा घेऊन त्यांनी 'आवडी' ही कादंबरी लिहिली. चिरागनगरची बरीच 'भुतं' आपल्याला 'चित्रा', 'वैजयंता', 'आग' आणि 'फुलपाखरू' या कादंबऱ्यांमध्ये आधीच भेटलेली असतात. 'जखम' ही कथा म्हणजे त्याच विषयावर असलेल्या 'मास्तर' या कादंबरीचेच संक्षिप्त रूप आहे. तसेच, 'आवडी' या कादंबरीमध्ये भेटलेला लख्या बारपुते पुढे एका वेगळ्या कथेचा विषय बनतो.

असे असले तरी अण्णा भाऊंनी मराठी कथासाहित्याला दिलेल्या योगदानाच्या मूल्यमापनाचा निष्कर्ष काढताना असे म्हणता येईल, की अण्णा भाऊंनी अनेक पातळ्यांवर मराठी लघुकथेचा पांढरपेशेपणाचा मार्ग बदलला. विषय आणि अनुभव यांच्या संदर्भात मराठी कथेची क्षितिजे विस्तृत केली, ती अण्णा भाऊंनीच. उपेक्षितांचे आणि पददलितांचे जणू ते साहित्यातील प्रवक्ते बनले. माणसापेक्षाही हीन दर्जाचे जीवन जगणाऱ्या माणसांचे त्यांनी साहित्यात चित्रण केले. एकंदर मराठी साहित्याला व विशेषतः मराठी कथेला अण्णा भाऊंचे हे लक्षणीय योगदान आहे. उपेक्षितांच्या, पददलितांच्या व पिळल्या जाणाऱ्या माणसांच्या जीवनाला त्यांच्याइतक्या जवळून इतर कुठल्याही लेखकाने स्पर्श केला नव्हता, त्यांचे अंतरंग इतक्या तपशीलवारपणे कुणीच उलगडून दाखवले नव्हते - अण्णा भाऊंनी नेमके हेच महत्त्वाचे कार्य केले.

■ ■ ■

4 : भोसले एस्. एस्. (संपादक) प्रस्तावना, प्रातिनिधिक कथा, अण्णा भाऊ साठे (मुंबई, लोकवाङ्मय गृह, 1985) पृष्ठ 11.

: 4 :

# लोकनाट्ये, नाटके व नाटिका

जगातील बहुतेक समाजांच्या खास स्वतःच्या अशा रंगमंचावर सादर करण्याच्या काही कला असतात. या कला सामाजिक स्तरांनुसार निर्माण होतात आणि विकास पावतात. त्यांची स्वतःची अशी काही खास वैशिष्ट्ये असतात. महाराष्ट्रात तमाशा ही अशा प्रकारची खास मराठी मातीतली कला आहे. अण्णा भाऊंनी लोकप्रिय केलेल्या, तमाशाच्या सुसंस्कृत प्रकाराला 'लोकनाट्य' म्हणून ओळखले जाते. तमाशा या कलेला अण्णा भाऊंनी प्रेक्षक, काळ, परिस्थिती आणि संदर्भ यांना शोभेल, असे स्वरूप दिले. अशा प्रकारे अण्णा भाऊंनी तमाशा या पारंपारिक लोककला प्रकाराला एक नवीनच परिमाण दिले.

अण्णा भाऊंच्या घराण्याचा अनेक पिढ्यांपासून तमाशा कलेशी संबंध होता. स्वः अण्णा भाऊंनी नाना मानवेकर आणि बापू साठे यांच्या तमाशांमध्ये अभिनय केला होता. याशिवाय 1960 पासून या कलाप्रकाराशी त्यांचा लेखक, दिग्दर्शक, अभिनेता अशा अनेक नात्यांनी अगदी जवळचा संबंध होता. त्यामुळे या कलाप्रकाराचे गुण, दोष आणि त्यातील अडचणी त्यांनी जवळून अनुभवल्या होत्या.

अण्णा भाऊंनी एकूण पंधरा लोकनाट्ये लिहिली. असे त्यांनी स्वतःच एके ठिकाणी म्हटले आहे. परंतु दुर्दैवाने ती सारी आज उपलब्ध नाहीत. आज फक्त पुढील लोकनाट्ये उपलब्ध आहेतः

1. अकलेची गोष्ट (1945)
2. खापऱ्या चोर (1946)
3. देशभक्त घोटाळे (1946)
4. निवडणुकीत घोटाळे (1946)
5. शेठजीचं इलेक्शन (1946)
6. बेकायदेशीर (1947)
7. माझी मुंबई (1948)
8. मूक मिरवणूक (1949)
9. लोकमंत्र्याचा दौरा (1952)
10. पुढारी मिळाला (1952)
11. बिलंदर बुडवे
12. पेंग्याचं लगीन
13. दुष्काळात तेरावा
14. इनामदार (नाटक, 1948)

'लाल बावटा' कलापथकासाठी अण्णा भाऊंनी लोकनाट्य, लावण्या, पोवाडे असे वाङ्मयप्रकार हाताळले. या कला पथकाने 1946 साली लोकनाट्यांचे प्रयोग करणे सुरू केले. 1945 सालच्या अखेरीस अण्णा भाऊंनी 'अकलेची गोष्ट' हे आपले पहिले लोकनाट्य लिहून पूर्ण केले होते. ते 1946 साली रंगमंचावर आले. त्यानंतर त्यांनी कलापथकासाठी एकामागून एक लोकनाट्ये लिहिली व कलापथकाच्या कलाकारांसमवेत सादर केली.

'अकलेची गोष्ट' या लोकनाट्याच्या कलात्मक गुणवत्तेबाबत असे म्हटले जाते, की विषय, संवाद, प्रस्तुतीकरण, कलात्मकता व परिणामकारकता यांच्याबाबतीत ते उत्कृष्ट होते. शारीरिक श्रम करणाऱ्या कामगारांना अगदी सहज समजेल अशा भाषेत, शास्त्रीय परिभाषा न वापरता कार्ल मार्क्सची इतिहासाच्या उत्क्रांतीची संकल्पना समजावून सांगणे व सामाजिक बदलाच्या प्रक्रियेमधील कामगारांचे स्थान त्यांच्या मनावर ठसवणे हा या लोकनाट्याचा मुख्य उद्देश होता.

मार्क्सच्या या संकल्पना अधिक स्पष्ट करताना अण्णा भाऊ या नाटकातून हे जग कामगारांच्या श्रमामधून तयार झाले आहे असे दाखवण्याचा प्रयत्न करतात. कामगार हा बदलाचा दूत आहे. पण एकीमधून प्राप्त होणाऱ्या बळाची कामगाराला कल्पना नाही. कामगाराच्या या अज्ञानाचा गैरफायदा घेऊन भांडवलदार, व्यावसायिक, पिळवणूक करणारे स्वार्थी व धूर्त लोक 'हे जग आम्ही तयार केले आहे' असा खोटा दावा करतात, आपण जगाचे निर्माते व जीवनदाते आहोत असा दावा करतात. परंतु, जानबासारखा वर्गजाणीव असलेला कामगार भांडवलदारांचा आणि पिळवणूक करणारांचा डाव त्यांच्यावरच उलटवू शकतो असे या नाटकात दाखवले आहे. जानबाच्या तोंडून लेखक अण्णा भाऊच बोलत आहेत असे वाटते.

ग्रामीण भागातील जमीनदार, सावकार आणि पारंपरिक व्यापारी यांचा अण्णा भाऊंना संताप होता, कारण बरेचदा हेच लोक सामान्य माणसाची पिळवणूक करीत. 'खापऱ्या चोर' या लोकनाट्यात अण्णा भाऊंनी या पिळवणूक करणाऱ्यांना आपल्या टीकेचे व थट्टेचे लक्ष्य बनवले आहे. अगदी किरकोळ रक्कम कर्जाने देऊन गरीब शेतकऱ्यांना कर्जात ठेवणाऱ्या व त्यांच्या जमिनी बळकावणाऱ्या सावकाराला धडा शिकवण्यासाठी वर्गजाणीव झालेले कामगार कोणकोणत्या युक्त्या लढवतात व त्याला शेतकऱ्यांच्या जमिनीवरील हक्क सोडायला लावतात, याचे विनोदी चित्रण 'खापऱ्या चोर' मध्ये केलेले आहे.

'देशभक्त घोटाळे' या लोकनाट्यात काँग्रेस पक्षाचे एक नेते श्री. घोटाळे यांच्यावर ताशेरे ओढलेले आहेत. देशभक्त घोटाळे हे पात्र पाखंडी, ढोंगी, वर्गदंभी आणि स्वार्थी असे आहे. श्री. घोटाळे आपले राजकीय संबंध आणि संपर्क वाढवण्यासाठी व पक्षाची संघटना मजबूत करण्यासाठी ग्रामीण भागात जातात. ग्रामीण भागातील ज्वलंत प्रश्नांची त्यांना काहीच जाणीव नसते. पुतळा नांवाची, वर्गजाणीव असलेली एक महिला अडचणीत आणणारे बरेच प्रश्न विचारून घोटाळेंना कचाट्यात पकडते. अभ्यासाचा, व्यासंगाचा, चिंतनाचा, अनुभवाचा आणि वस्तुस्थितीच्या जाणिवेचा अभाव असल्याने श्री. घोटाळे या प्रश्नांमुळे कसे गोंधळात पडतात, हा या लोकनाट्याचा मुख्य विषय आहे.

'देशभक्त घोटाळे' या लोकनाट्यातील घोटाळे यांच्याच हास्यास्पद कारवायांचे वर्णन 'निवडणुकीत घोटाळे' या लोकनाट्यातही पुढे चालू रहाते. त्यामुळे, या दोन लोकनाट्यांना एकत्रितपणे 'घोटाळे संच' असे म्हणता येईल. 'निवडणुकीत घोटाळे' मध्ये श्री. घोटाळे कशा प्रकारे निवडणूक लढवतात व आणखीच गुंता करून ठेवतात हे दाखवले आहे. त्यामुळे मतदार त्यांची खिल्ली उडवतात. श्री. घोटाळे आपल्या भाषणात महात्मा गांधी यांचेच, वापरून गुळगुळीत झालेले 'हृदयपरिवर्तन', 'उपोषणाचे महत्त्व' इत्यादी शब्दप्रयोग वापरतात. अण्णा भाऊंनी श्री. घोटाळे हे तत्कालीन काँग्रेस संस्कृतीचे प्रतिनिधी म्हणून रेखाटले आहेत.

'शेठजीचं इलेक्शन' हे लोकनाट्य 1946 सालच्या, स्वातंत्र्यपूर्व भारतातील निवडणुकींच्या पार्श्वभूमीवर लिहिलेले आहे. या काळात भारत स्वातंत्र्याच्या उंबरठ्यावर उभा होता. ती निवडणूक स्वातंत्र्यलढ्याच्या पार्श्वभूमीवरील पहिली निवडणूक असल्याने तिला खूप महत्त्व प्राप्त झाले होते. प्रतिस्पर्धी पक्षांच्या उमेदवारांपेक्षा आपले उमेदवार अधिक संख्येने निवडून यावेत असे प्रत्येक पक्षाला वाटत होते. कम्युनिस्ट पक्ष आणि त्याचा जाहीरनामा हे सामान्य लोकांना अनुकूल



आहेत; तर काँग्रेस हा श्रीमंतांचा, भांडवलदारांचा व स्थितिप्रिय लोकांचा पक्ष आहे. त्यामुळे निवडणुकीत काँग्रेस पक्षाची फजिती होऊन त्याचा धुव्वा उडाला पाहिजे हे पटवून देणे हा या लोकनाट्याचा हेतू होता.

'बेकायदेशीर' हे नाटक 1947 च्या निवडणुकांवर प्रकाश टाकते. पैशांचे पाठबळ असलेला शेठ मगरचंद हा उमेदवार निवडून येतो व पुढे मंत्रीसुद्धा होतो. तो ज्या मालक आणि भांडवलदार वर्गातून आलेला असतो, त्या वर्गाच्या हिताचे रक्षण करण्यासाठी मगरचंद हा रघुनाथकमल याच्या मालकीच्या गिरण्यांमधील कामगारांनी पुकारलेला संप बेकायदेशीर आहे असे जाहीर करतो. कामगारांना न्याय नाकारण्याचा प्रयत्न करतो. परंतु, शेवटी कामगार आपला संप अधिक तीव्र करतात व त्यामुळे सगळे गिरणीमालक घाबरून कामगारांच्या मागण्या मान्य करतात.

'माझी मुंबई' हे लोकनाट्य भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाच्या पार्श्वभूमीवर लिहिलेले आहे. त्या-त्या प्रदेशातील प्रमुख भाषेनुसार भाषावार प्रांतरचना व्हावी व ती प्रमुख भाषा ही त्या राज्याची भाषा असावी असे सरकारचे धोरण होते. त्यामुळे, मुंबई महाराष्ट्रात असावी की गुजरातमध्ये हा तीव्र वादाचा मुद्दा बनला. औद्योगिकदृष्ट्या प्रगत अशा या बेटावर दोन्हीही राज्ये आपला हक्क सांगत होती. भारताचे माजी पंतप्रधान कै. मोरारजी देसाई हे तेव्हा मुंबई राज्याचे मुख्यमंत्री होते. तत्कालीन मुंबई राज्यात आजची, महाराष्ट्र व गुजरात म्हणून ओळखली जाणारी दोन्ही राज्ये समाविष्ट होती. श्री. देसाई हे मूळचे गुजराती असल्याने, ते मुंबई गुजरातमध्ये समाविष्ट व्हावी या मताचे होते. पण मुंबई महाराष्ट्राला मिळावी हा महाराष्ट्रीयांनी आपल्या जीवन-मरणाचा प्रश्न बनवला, व या मुद्द्यावर लढा देण्यासाठी महाराष्ट्रभर 'संयुक्त महाराष्ट्र चळवळ' ही सर्वमान्य चळवळ तीव्रपणे सुरू झाली.

याच विषयावर अण्णा भाऊंनी 'माझी मुंबई' हे लोकनाट्य लिहिले व मुंबई ही महाराष्ट्राची आहे हे ठामपणे सांगण्याचा प्रयत्न केला. या लोकनाट्याचा विषय हा आता इतिहासाचा भाग झाला असला, तरी त्यातील 'काळ्या बाजाराचा पोवाडा' हा पोवाडा मात्र आजही ताजा व सद्य परिस्थितीला लागू पडणारा वाटतो. आपल्या देशातील सामान्य माणसाच्या वेदना अण्णा भाऊंनी या पोवाड्यात अतिशय परिणामकारकपणे व योग्यपणे चित्रित केल्या आहेत. या पोवाड्यामुळेच 'माझी मुंबई' या नाटकाला अक्षरत्व मिळाले आहे.

'मूक मिरवणूक' हे लोकनाट्य सामाजिक, आर्थिक आणि तत्सम समस्यांना

उत्तरे शोधण्याच्या समाजवादी व साम्यवादी पक्षांच्या कार्यपद्धतींमधील फरक स्पष्ट करण्यासाठी अण्णा भाऊंनी लिहिले. भारतीय समाजवाद्यांची कार्यशैली मवाळ व त्यामुळे परिणाम न साधणारी; तर साम्यवादी पक्षाची कार्यपद्धती जहाल व फलप्रद अशी दाखवण्यात आली आहे.

'लोकमंत्र्याचा दौरा' हे लोकनाट्य 1952 साली महाराष्ट्रात झालेल्या राजकीय घडामोडींवर लिहिलेले आहे. 1952 मध्ये महाराष्ट्रात काँग्रेसचे सरकार पहिल्यांदा सत्तेवर आले. परंतु असे दिसले, की या मंत्रिमंडळातील बऱ्याचशा मंत्र्यांना सामान्य जनतेच्या समस्यांचे ज्ञान नव्हते. ते संधिसाधू होते आणि सामान्य जनतेच्या जीवनाशी त्यांचा प्रत्यक्ष संपर्क नव्हता. त्यामुळे मंत्री खऱ्या समस्यांऐवजी दुसऱ्याच प्रश्नांबद्दल बोलत व त्यांचा कळवळा खोटा असे. अशा प्रकारे 'लोकमंत्र्यांचा दौरा' मध्ये महाराष्ट्रातील 1952 सालच्या पहिल्या काँग्रेस मंत्रिमंडळाचे दोष दाखवलेले आहेत.

'शेठजीचं इलेक्शन', 'बेकायदेशीर' आणि 'लोकमंत्र्याचा दौरा' यांना 'मगरचंद नाट्यत्रयी' म्हणता येईल, कारण या तीनही नाटकांमध्ये मगरचंद ही मध्यवर्ती व्यक्तिरेखा आहे.

'पुढारी मिळाला' या लोकनाट्याच्या जन्मामागे थोडा इतिहास आहे. प्रख्यात मराठी लेखक श्री. पु. ल. देशपांडे यांनी 'पुढारी पाहिजे' हे नाटक लिहिले होते. पु. लं. च्या या नाटकाला उत्तर म्हणून अण्णा भाऊंनी 'पुढारी मिळाला' हे नाटक लिहिले. कृष्णा नदीकाठच्या वाघिरे या गावातील गावकरी पुढाऱ्याच्या निवडीबाबत संभ्रमात असतात. शेवटी काँग्रेस, समाजवादी व इतर पक्षांनी देऊ केलेल्या पुढाऱ्यांऐवजी ते सत्तू नांवाच्या एका क्रांतिकारकाला आपला पुढारी म्हणून निवडतात.

'बिलंदर बुडवे' ही नाट्यरचना 'बुडवे' आडनांवाच्या एका कावेबाज माणसाच्या फसवणुकीच्या कारवाया चित्रित करते. विनोदाची फोडणी असल्याने ही नाटिका अण्णा भाऊंच्या काळातील कामगारांमध्ये खूप लोकप्रिय होती.

महाराष्ट्रातील कोकण विभागात रहाणाऱ्या व काम करणाऱ्या तिल्लोरी समाजाच्या कलाकारांसाठी अण्णा भाऊंनी 'पेंग्याचं लगीन' ही नाटिका कोकणी भाषेत लिहिली. या नाटिकेचा मूळ उद्देश भारतात आणि विशेषतः महाराष्ट्रात विवाहासंदर्भात प्रचलित असलेल्या अनिष्ट प्रथांचा उपहास करणे हा आहे. या अनिष्ट प्रथा म्हणजे लग्नसमारंभावर करावा लागणारा अनावश्यक असा प्रचंड खर्च आणि हुंड्याची प्रथा.



1947 ते 1962 या कालखंडात अण्णा भाऊंच्या लोकनाट्यांनी मराठी भाषक नाट्यरसिकांना वेड लावले होते. या नाटकांमधील बरीचशी भाष्ये ही तत्कालीन परिस्थितीवर होती, आणि त्यामुळे त्या लोकनाट्यांना मर्यादाही होत्या. याची उदाहरणे म्हणून 'देशभक्त घोटाळे', 'बेकायदेशीर', 'लोकमंत्र्याचा दौरा' आणि 'माझी मुंबई' या लोकनाट्यांचा उल्लेख करता येईल.

अण्णा भाऊंच्या लोकनाट्यांमागे दोन प्रमुख उद्देश होते असे दिसते. ते म्हणजेः 1) तत्कालीन काँग्रेस पक्ष, त्याचा जाहीरनामा आणि कार्यपद्धती यांच्यावर टीका करणे; व 2) कम्युनिस्ट पक्ष, त्याची धोरणे आणि कार्यक्रम यांचे सकारात्मक व अनुकूल असे चित्र लोकांपुढे प्रस्तुत करणे.

अण्णा भाऊंच्या मते काँग्रेस पक्ष म्हणजे भांडवशाहीचे प्रतीक होते. त्यामुळे साहजिकच काँग्रेस पक्ष भांडवलशाहीला अनुकूल अशी धोरणे राबवतो आहे असे त्यांना दिसते. त्यामुळे, त्यांचा अंतिम संघर्ष हा काँग्रेस पक्षाविरुद्ध नव्हे, तर भांडवलदारी मनोवृत्तीतून होणाऱ्या सामान्य जनांच्या पिळवणुकीविरुद्ध आहे.

1948 साली अण्णा भाऊंनी आपल्या लेखन-कारकीर्दीतील पूर्ण लांबीचे असे एकमेव नाटक लिहिले. ते नाटक म्हणजे 'इनामदार'. हे नाटक त्यांच्याच 'वैर' या कादंबरीवर आधारीत आहे. एक जमीनदार आणि ज्यांच्या जमिनी जमीनदाराने बळकावल्या आहेत असे त्याच्या गावातील अनेक गावकरी यांच्यामधील संघर्ष व शेवटी गावकऱ्यांचा जमीनदारावर विजय ही या नाटकाची मध्यवर्ती कल्पना आहे.

अण्णा भाऊंच्या लेखनाच्या केंद्रस्थानी आहे ते मार्क्सवादाचे तत्त्वज्ञान. इतर कुठल्याही अस्सल मार्क्सवादी लेखकाप्रमाणे अण्णा भाऊ कला हे समानता प्रस्थापित करणे आणि पिळवणूक व अन्याय यांचा अंत करणे ही उद्दिष्टे साधणारे सामाजिक बदलाचे एक साधन आहे असे मानीत. कलेबद्दलच्या या दृष्टिकोनामुळे आपली लोकनाट्ये पुराणमतवादी समीक्षकांच्या निकषानुसार कलात्मकदृष्ट्या व शैलीदृष्ट्या परिपूर्ण करण्याची त्यांनी कधीच पर्वा केली नाही. लोकनाट्य हा सामान्य माणसांसमोर सादर करण्याचा कलाप्रकार असल्याने त्यामध्ये सोपेपणा आणि स्पष्टपणा असावा लागतो. अण्णा भाऊंनी आपल्या लोकनाट्यांमध्ये ही वैशिष्ट्ये मोठ्या प्रमाणावर समाविष्ट केली. त्यामुळे अण्णा भाऊंचे लेखन हे 'कलेसाठी कला' हे ज्यांचे ब्रीद होते त्यांच्या विरोधात उभे राहिलेले दिसते.

साहित्याच्या क्षेत्रात अण्णा भाऊ हे सामान्य लोकांचे नेते होते असे म्हणता येईल. भारतातील सामान्य माणसाची दुर्दशा पाहून ते अगदी मुळापासून हादरले

होते. त्यामुळे त्यांनी आपल्या नाटकांमधून राज्यकर्त्यांच्या पाखंडीपणाचा बुरखा फाडण्याचा प्रयत्न केला आणि सामान्य जनांच्या वेदना व्यक्त केल्या.

अण्णा भाऊंच्या लोकनाट्यांचे विषय आणि संरचना पहाता असे दिसते, की पारंपरिक वगनाट्ये आणि अण्णा भाऊंची लोकनाट्ये यांच्यामध्ये विषय व संरचना यांच्याबाबतीत बराच फरक आहे. अण्णा भाऊंची लोकनाट्ये हे वगनाट्याचेच परिष्कृत स्वरूप आहे. वगनाट्ये ही मुख्यतः दंतकथा, पुराणकथा, ऐतिहासिक कथा व महाराष्ट्रातील लोकप्रिय प्रेमकथांवर आधारलेली असत. अण्णा भाऊंच्या लोकनाट्यांपूर्वीची जुनी वगनाट्ये नल-दमयंती, हरिश्चंद्र-तारामती यांच्या कथांवर आधारित असत. प्रणय आणि अध्यात्म यांचे मिश्रण या वगनाट्यांत सहेतुकपणे केलेले असे.

वगनाट्य हा तमाशाचा एक घटक असतो. तमाशाच्या प्रस्तुतीकरणाचा क्रम पुढीलप्रमाणे असे - प्रथम 'गण' होई - 'गण' म्हणजे कला आणि संस्कृतीचे दैवत असलेल्या गणेशाची प्रार्थना. त्यानंतर असे 'गवळण' - कृष्ण आणि गवळणी यांच्यातील नर्मविनोदी भाषेतील तसेच हावभावांसहित थट्टामस्करी. गवळणी नंतर असे 'बतावणी' - एकमेकांना फसवण्याचा प्रयत्न करणाऱ्या दोन व्यक्तींमधील विनोद निर्माण करणारा संवाद, आणि शेवटी 'वग' किंवा वगनाट्य. थोडक्यात म्हणजे, दैनंदिन जीवनात सामान्य माणसांना सतावणाऱ्या भौतिक समस्यांसाठी तमाशात जागाच नव्हती. याउलट, त्यात देवदेवतांचे आणि कृष्ण व गवळणींमधील प्रणयाचे चित्रण व प्रस्तुतीकरण असे. पारंपारिक तमाशाची मूलभूत संरचना अशा प्रकारची होती.

शैली, संरचना आणि विषयाचे प्रस्तुतिकरण यांच्या बाबतीत अण्णा भाऊंनी आपल्या लोकनाट्यांमध्ये पारंपारिक तमाशापेक्षा मूलतःच वेगळेपण जपले व जोपासले. तमाशाचे कल्पनारम्य, अंधश्रद्धांचे समर्थन करणारे, धार्मिक आणि आध्यात्मिक असे मूळचे स्वरूप त्यांनी बदलले. त्यांनी भौतिक तसेच सामान्य लोकांसमोरील चालू व ज्वलंत समस्यांवर लोकनाट्ये लिहिली. तमाशामध्ये त्यांनी लोकांच्या समस्यांना उत्तरे शोधताना बोलणे आणि वागणे यांच्यातील सुसंगतपणा, शास्त्रीय दृष्टिकोण, निर्भयता या तत्त्वांचा समावेश केला, आणि तमाशाला समकालीन समस्यांच्या चर्चेसाठीचे एक खुले व्यासपीठ बनवले. याच कारणामुळे त्यांनी लिहिलेल्या एकूण पंधरा लोकनाट्यांपैकी एकही लोकनाट्य ऐतिहासिक, पौराणिक किंवा धार्मिक विषयावर आधारलेले नाही.

देव-देवतांना 'गणा'च्या केंद्रस्थानी ठेवण्याचा तमाशाच्या पारंपारिक प्रथेऐवजी



अण्णा भाऊंनी आपल्या लोकनाट्यांतील 'गणा' मध्ये छत्रपती शिवाजी महाराज, लोकमान्य टिळक यांच्यासारख्या लोकनेत्यांना, तसेच सामाजिक बांधिलकी मानत असल्याने लोकांना आदरणीय वाटणाऱ्या ज्ञानेश्वर, तुकाराम यांच्यासारख्या संतकवींना केंद्रस्थानी ठेवले. आपल्या लोकनाट्यांमधून त्यांनी पारंपारिक तमाशातील सोंगाड्याला वगळले.

महिलांची थट्टामस्करी हा पारंपारिक तमाशाचा एक अविभाज्य भाग असे. परंतु अण्णा भाऊंनी आपल्या लोकनाट्यांमधून या प्रकारालाही पूर्णपणे-काट दिली. महिलांनाही स्वाभिमान असतो व तो आपण जपायला हवा हे केवळ मान्य करून किंवा प्रतिपादन करून चालणार नाही, तर त्याप्रमाणे वर्तनही करायला हवे, या ठाम भूमिकेतूनच त्यांनी लोकनाट्यांमधून महिलांची मस्करी करणे थांबवले.

सामान्य लोकांची पिळवणूक, अशा पिळवणुकीविरुद्ध लोकांचे आंदोलन व त्यामुळे लोकांमध्ये वर्गजाणीव निर्माण होणे हे त्यांच्या लोकनाट्यांचे काही प्रमुख विषय होते.

तमाशाचा अविभाज्य भाग असलेल्या, कृष्ण आणि गवळणी यांच्यामधील सूचक अर्थ असलेल्या शृंगारिक संवादांनाही अण्णा भाऊंनी आपल्या लोकनाट्यांमधून फाटा दिला. त्यांच्या ठिकाणी अण्णा भाऊंनी ताज्या व महाराष्ट्राच्या लोकजीवनाशी संबंधित अशा काळा बाजार, युद्ध, संप, निवडणुका, राजकीय पक्षांचे जाहीरनामे, मोर्चे, टाळेबंद्या, दुष्काळ, संयुक्त महाराष्ट्र चळवळ अशा समस्यांवरील चर्चांना स्थान दिले.

सर्वात महत्त्वाचे म्हणजे, अण्णा भाऊंनी हे मूलभूत बदल आणले, ते अगदी सोप्या आणि सहज भाषेत. हे त्यांचे खरेखुरे योगदान व यश होते. उमा-बापू, पठ्ठे बापूराव अशा कलाकारांनी तमाशाकलेला दिलेल्या योगदानाचा योग्य आदर ठेवून, अण्णा भाऊंना तमाशाचा कायाकल्प करणारे आधुनिक काळातील सर्वोत्तम कलाकार म्हणून मानाचे पान द्यायला हवे. या क्षेत्राला त्यांनी दिलेले मौलिक योगदान कायम स्मरले जाईल.

■ ■ ■

# 5

# पद्यरचना

अण्णा भाऊंच्या वैचारिक बांधिलकीचा विचार करता, ते एक कम्युनिस्ट होते हे आतापर्यंत पुरेसे स्पष्ट झालेले आहे. त्यांच्या पद्यरचनांनासुद्धा हे लागू पडते. सर्वच कम्युनिस्टांप्रमाणे अण्णा भाऊंच्या मतेसुद्धा माणसांचे फक्त दोनच वर्ग आहेत. ते म्हणजेः 1) श्रीमंतांचा/पिळवणूक करणारांचा वर्ग (बूर्झ्वा), 2) गरीब लोकांचा/पिळवणूक होणारांचा वर्ग (प्रॉलेटॅरिएट). या दोन वर्गांमध्ये कधीतरी संघर्ष होईल आणि त्या संघर्षामध्ये गरिबांचा विजय होईल असेही त्यांना वाटत असे. आणि जरी गरीब हरले, तरी आपल्या शृंखलांशिवाय गमावण्यासारखे त्यांच्याकडे काहीच नाही, असे अण्णा भाऊंचे मत होते. कम्युनिस्ट विचारप्रणालीप्रमाणेच धर्म ही सामान्य लोकांची अफू आहे, आणि मानवजातीच्या प्रगतीमध्ये जाती आणि वर्ग हे घातक अडथळे आहेत असा त्यांचाही विश्वास होता.

इतर साहित्यप्रकारांतील आपल्या लेखनाप्रमामेच पद्यलेखनातून व काव्यलेखनातूनही अण्णा भाऊंनी जे उदात्त आणि प्रशंसनीय आहे त्याची भलावण केली आहे; आणि जे निंदनीय व अधम आहे त्याचा धिक्कार केला आहे. आधुनिक मराठी साहित्यात एक प्रगतिशील व वैज्ञानिक विचारसरणीचे लेखक म्हणून त्यांना महत्त्वाचे स्थान आहे. आपल्या पद्य व काव्यलेखनाच्या कारकीर्दीत त्यांनी मराठीतील पुढील लोकगीतांचे प्रकार हाताळलेः

1. पोवाडा
2. लावणी
3. पदे
4. गीते
5. गण
6. छक्कड.

विषयांनुसार त्यांच्या पद्यरचनांची वर्गवारी करता येते. अर्थात् ही वर्गवारी काटेकोर नाही; कारण काही पद्यरचना एकापेक्षा अधिक प्रकारांमध्येही मोडू शकतात. सामान्यपणे त्यांच्या पद्यरचनांची वर्गवारी आपण पुढीलप्रमाणे करू शकतोः

अ. पोवाडे.
ब. मार्क्सवादी विचारसरणीच्या पद्यरचना.
क. महाराष्ट्र व मराठी संस्कृती यांच्यावरील प्रशंसापर पद्यरचना.
ड. मुंबईबद्दलच्या कविता.
इ. निसर्गवर्णनपर कविता.
फ. कल्पनारम्य कविता.
ग. राष्ट्रीय कविता.

## अ. पोवाडे

अण्णा भाऊंनी एकूण पंधरा पोवाडे लिहिले असे म्हटले जाते, परंतु आज त्यांच्यापैकी फक्त नऊ पोवाडे उपलब्ध आहेत. ते असेः

1. स्टालिनग्राडचा पोवाडा : 1942
2. बंगालची हाक : जुलै 23, 1944
3. बर्लिनचा पोवाडा : 1946
4. पंजाब-दिल्लीचा दंगा : 1947
5. तेलंगणाचा संग्राम : 1947
6. महाराष्ट्राची परंपरा : 1947
7. अमळनेरचे अमर हुतात्मे : 1947
8. मुंबईचा गिरणी-कामगार : 1949
9. काळ्या बाजाराचा पोवाडा : 1949

'स्टालिनग्राडचा पोवाडा' हा सात चौकांचा (भागांचा) आहे. पोवाड्याची रचना गाण्यासाठी केली जात असल्याने, या पोवाड्याला स्वतःची अशी चाल आहे. शाहीर अण्णा भाऊंनी सात चौकांसाठी सात वेगवेगळ्या चाली वापरल्या आहेत. त्यामुळे प्रत्येक चौकाला स्वतंत्र अशी चाल आहे. स्टालिनग्राड या महत्त्वाच्या रशियन शहरावरील नाझींच्या आक्रमणाचे वर्णन या पोवाड्यात करण्यात आले

आहे. रशियन सैन्य, नागरिक आणि महिला यांनी नाझींना कसा धाडसाने व शौर्याने लढा दिला व स्टालिनग्राड - पर्यायाने रशिया - पर्यायाने जग घशात टाकण्यासाठी आलेल्या नाझी सैतानांना कसे पराभूत केले याचेही शाहिरांनी कौतुक केले आहे.

'बंगालची हाक' हा पोवाडा त्यांनी बंगालमधील भयानक दुष्काळाच्या पार्श्वभूमीवर लिहिला. हा दुष्काळ इतका भीषण होता, की त्यात हजारो लोक भुकेने मरण पावले. महिलांना जगण्यासाठी व आपल्या मुलांना जगवण्यासाठी शरीरविक्रय करावा लागला. एवढे करूनही त्यांच्यापैकी अनेकजणी जगू शकल्या नाहीत. त्यात साठेबाजी करून अन्न, कपडे यांच्यासारख्या आवश्यक वस्तूंची कृत्रिम टंचाई निर्माण करण्याच्या काळा बाजारवाल्यांच्या नीच वृत्तीमुळे दुष्काळाची ही नैसर्गिक आपत्ती आणखीच तीव्र झाली. अण्णा भाऊंचे संवेदनशील हृदय व मन उपासमार, रोगराई व मरण यांच्या या तांडवामुळे हेलावले. सर्व प्रकारची जास्तीत जास्त मदत आपत्तीत सापडलेल्या बंगाली बांधवांनना पाठवण्याचे आवाहन अण्णा भाऊंनी या पोवाड्यातून महाराष्ट्रीय जनतेला केले. या आवाहनामुळे मुंबईच्या लोकांनी खूप मदत पाठवली असे म्हणतात.

'स्टालिनग्राडचा पोवाडा' या पोवाड्याप्रमाणेच 'बर्लिनचा पोवाडा' हा पोवाडासुद्धा तीन चौकांत लिहिलेला आहे. हा पोवाडा आंतरराष्ट्रीय युद्धावरील आहे. या पोवाड्यात शाहीर अण्णा भाऊंनी रशियन सैन्याच्या बर्लिनवरील हल्ल्याची आणि नाझींवरील विजयाची स्तुती केली आहे. आंतरराष्ट्रीय पातळीवर झालेल्या साम्यवादाच्या वाढीचा आढावाही या पोवाड्यात घेण्यात आला आहे.

'पंजाब-दिल्लीचा पोवाडा' हा चार चौकांत लिहिलेला आहे. भारतीय स्वातंत्र्याच्या पहाटेला दोन प्रमुख घटना घडल्या हे आता सर्वज्ञात आहे. त्या घटना म्हणजेः 1) भारताची भारत व पाकिस्तान अशा दोन देशांमध्ये फाळणी; व 2) हिंदु-मुस्लिम यांच्यातील भयानक दंगे. हे दंगे पंजाब व दिल्लीमध्ये अतिशय मोठ्या प्रमाणावर व तीव्र स्वरूपात झाले. ब्रिटिश आणि भारत व पाकिस्तानमधील श्रीमंत हे या दंग्यांच्या पाठीमागे होते. आपापल्या (म्हणजेच मुस्लिम किंवा हिंदू) धर्मातील धर्मांधांना ते पाठिंबा देत होते. भारताचे तारू वादळात सापडले आहे असे अण्णा भाऊंना वाटले व याचे त्यांना पराकोटीचे दुःख झाले. शाहिरांच्या या मनापासूनच्या करुणेनेच त्यांना प्रगतिशील शक्तींना व भारत-भक्तांना देश वाचवण्यासाठी पुढे येण्याचे कळकळीचे आवाहन करण्यास भाग पाडले.

'तेलंगणाचा संग्राम' हा पोवाडा समजण्यासाठी या संग्रामाच्या इतिहासाच्या



काही तपशिलांची माहिती असणे आवश्यक आहे. तेलंगण हा आंध्र प्रदेशातील एक भाग आहे. स्वातंत्र्यपूर्व काळात व स्वातंत्र्योत्तर काळाच्या काही भागात आंध्र प्रदेशावर निजाम या एका मुस्लिम घराण्याचे राज्य होते. आपल्या प्रदेशातील सामान्य माणसांची पिळवणूक करणे व छळ करणे हे त्याचे धोरण होते. 'रझाकार' नांवाच्या एक धर्मांध संघटनेच्या द्वारे निजामाने आपल्या प्रदेशातील लोकांवर दहशत बसेल असे वातावरण तयार केले होते. रझाकार संघटनेबद्दल निजामाच्या सर्वसाधारण जनतेच्या मनात घृणा आणि भीती होती. आपल्या घराण्याचा अंमल पुढे चालवण्यासाठी निजामाने ब्रिटिशांना पाठिंबा देणे चालू ठेवले. भारत स्वतंत्र झाल्यानंतरसुद्धा निजाम आपला प्रदेश उर्वरित भारतामध्ये विलीन करण्याच्या कट्टर विरोधात होता. निजामाच्या या धोरणाला शह देण्यासाठी आणि विलीनीकरणाचा प्रस्ताव मान्य करण्यासंदर्भात त्याच्यावर दबाव आणण्यासाठी तेलंगणाच्या लोकांनी निजामाच्या सैन्याविरुद्ध सशस्त्र आंदोलन सुरू केले. निजामाविरुद्धच्या या आंदोलनाला पाठिंबा म्हणून अण्णा भाऊंनी 'तेलंगणाचा संग्राम' हा पोवाडा लिहिला.

'महाराष्ट्राची परंपरा' या पोवाड्यात अण्णा भाऊंनी हाताळलेला महाराष्ट्राची परंपरा हा विषय मराठी मनाला अतिशय जवळचा व जिव्हाळ्याचा असल्याने, हा पोवाडा त्यांच्या सर्वाधिक लोकप्रिय पोवाड्यांपैकी एक आहे. सोळा पृष्ठे व्याप्ती असलेल्या या पोवाड्यातून शाहीर आपणापुढे महाराष्ट्राची ऐतिहासिक, भौगोलिक, सांस्कृतिक, राजकीय, भाषिक, साहित्यिक, सामाजिक व क्रांतिकारी परंपरा सादर करतात. या पोवाड्यात ते विविध क्षेत्रांत महाराष्ट्रातील पुढील थोर व्यक्तींनी दिलेल्या योगदानाचे स्मरण करतातः

1. सांस्कृतिक, धार्मिक, साहित्यिक वा भाषिक क्षेत्र : संत ज्ञानेश्वर.
2. सामाजिक कार्याचे क्षेत्र : महात्मा फुले.
3. राजकीय क्षेत्रातील क्रांतिकारक : छत्रपति शिवाजी महाराज, कान्होजी आंग्रे, उमाजी नाईक, तात्या टोपे, लोकमान्य टिळक, वासुदेव बळवंत फडके, क्रांतिसिंह नाना पाटील.

याव्यतिरिक्त आणखीही खूप काही या सहा चौकांच्या पोवाड्यात त्यांनी महाराष्ट्राबद्दल सांगितले आहे.

'अमळनेरचे अमर हुतात्मे' हा पोवाडा कॉम्रेड श्रीपती पाटील व त्यांच्या आठ सहकाऱ्यांच्या धाडसाची स्तुती करण्यासाठी लिहिला आहे. कम्युनिस्ट कार्यकर्त्यांच्या न्याय्य आंदोलनाला दडपण्यासाठी त्या काळच्या महाराष्ट्र सरकारचे गृहमंत्री

असलेल्या मोरारजी देसाई यांच्या आदेशावरून पोलिसांनी गोळीबार केला. त्यात कॉम्रेड पाटील व त्यांचे सहकारी हुतात्मे झाले होते.

'मुंबईचा गिरणी कामगार' या पोवाड्यात अण्णा भाऊंनी 1908 ते 1950 या कालखंडातील गिरणी कामगारांच्या जीवनातील विविध अशा महत्त्वाच्या टप्प्यांचे, कार्यांचे, आंदोलनांचे व यशांचे ऐतिहासिक सर्वेक्षण सादर केले आहे. हा कालखंड म्हणजे 1908 मध्ये ब्रिटिशांनी टिळकांना केलेल्या अटकेच्या कामगारांनी केलेल्या निषेधापासून तर 1950 मध्ये बोनससाठी त्यांनी केलेल्या आंदोलनापर्यंतचा कालखंड आहे. पोवाड्याच्या शेवटी अण्णा भाऊ राजकीय, सामाजिक व लोकशाही क्षेत्रातील जहाल, समाजवादी, शेतकरी-कामगार पक्ष व दलित फेडेशन अशा सर्वांना एकत्र येऊन कम्युनिस्टांबरोबर ऐक्याने लढण्याची हाक देतात, कारण या सर्वांची विचारसरणी मूलतः डावी आहे.

अण्णा भाऊंनी 'काळ्या बाजाराचा पोवाडा' हा खूप पूर्वी, 1949 साली लिहिलेला असला, तरी तो आजही ताजा व आजच्या परिस्थितीला लागू पडणारा वाटतो. याचे कारण म्हणजे एकंदर भारताला व विशेषतः महाराष्ट्राला छळत असलेली काळ्या बाजाराची समस्या अण्णा भाऊंनी या पोवाड्यात हाताळली आहे.

## ब. मार्क्सवादी विचारसरणीच्या पद्यरचना

शाहीर अण्णा भाऊंच्या पुढील पद्यरचना साधारणपणे या वर्गामध्ये मोडू शकतात असे दिसतेः

1. कामगार स्तवन.
2. काळा बाजार.
3. एकजुटीचा नेता.
4. तू मराठमोळा.
5. बोलत कडेकपारी.
6. शिवारी चला
7. दुनियेची दौलत सारी
8. तेलाशिवाय जळतो दिवा
9. चिनी जनांची मुक्तिसेना
10. लेनिन शुभनामाचे



'कामगार स्तवन' ही रचना कामगारांच्या स्तुतीसाठी रचलेली असून कामगार हाच कसा जगाला गती देणारा आणि आदि-क्रांतिकारक आहे हे दाखवते.

'काळा बाजार' या रचनेत काळा बाजार करणारे व साठेबाज लोक आवश्यक वस्तूंची कृत्रिम टंचाई कशी निर्माण करतात हे दाखवले आहे. काळा बाजारवाल्यांच्या कारवायांना आळा घालण्यामध्ये सरकारचा 'रेशनिंग ॲक्ट' कसा अयशस्वी झाला आहे याचेही वर्णन अण्णा भाऊंनी या रचनेत केले आहे.

'एकजुटीचा नेता' या रचनेत, कामगारांच्या नेतृत्त्वाखाली भारतात वर्गविहीन समाजाचे स्वप्न साकार झालेले शाहीर पहातात. नेत्यांची एकजूट करण्यामध्ये कामगार महत्त्वाची भूमिका बजावतील असे त्यांना वाटते. ते शेतकऱ्यांना व दलितांना एकत्र करतील व त्यांचे नेतृत्त्व करतील.

'तू मराठमोळा' या रचनेत, महाराष्ट्रातील शेतकरी पिकांसारख्या सुंदर गोष्टींचा निर्माता असूनही स्वतः मात्र सर्वच पातळ्यांवर कसा दारिद्र्यात रहातो याचे चित्रण आहे. म्हणूनच, 'हे जग आपल्याला अनुकूल असे बदला' असे आवाहन शाहीर शेतकऱ्यांना करतात.

'बोलत कडे कपारी' या रचनेत अण्णा भाऊ त्यांच्या मते काँग्रेसने लोकांना फसवून कशा प्रकारे असहाय केले आहे हे दाखवतात. शेवटी, कम्युनिस्टांच्या लाल बावट्याखाली एकत्र येऊन असहाय लोकांनी आपला असहायपणा झटकून टाकला आहे असे प्रसन्न चित्र अण्णा भाऊंनी रेखाटले आहे.

'शिवारी चला' या रचनेतून त्यांनी सामान्यजनांना सावकारी, भांडवलदारी आणि साम्राज्यवाद यांना मुळापासून उखडून टाकून नष्ट करण्याचे आवाहन केले आहे. ही उद्दिष्टे साध्य करण्यासाठी सामान्य लोकांनी लाल बावट्याखाली एकत्र येऊन काम करावे अशी शारिरांची अपेक्षा आहे.

अण्णा भाऊ हे जमीनदारांच्या व सरंजामदारांच्या पूर्णपणे विरोधात होते. या जमीनदारांची हजारो एकर जमीन असे, पण ते ही जमीन स्वतः न कसता भूमिहीन मजुरांकडून कसवून घेत आणि स्वतः आरामात बसून खात. ज्या व्यवस्थेमध्ये मुळीच श्रम न करणारा मजा मारीत होता आणि खरे श्रम करणारा कसाबसा जगत होता, त्या व्यवस्थेला अण्णा भाऊंनी स्वाभाविकपणेच कडवा विरोध केला.

'दुनियेची दौलत सारी' या रचनेत शाहीर जगाची संपत्ती असलेल्या विविध पिकांबद्दल बोलतात व शेवटी, श्रम न करता आरामात खाणारांना हाकलून लावण्याचे भूमिहीन मजुरांना आवाहन करतात. 'कसेल त्याची जमीन' असा रिवाज

प्रस्थापित करण्याची त्यांची इच्छा आहे.

'तेलाशिवाय जळतो दिवा' या रचनेत सामान्य माणसासाठी केरोसीन, गहू, साखर, खाण्याचे तेल या अत्यावश्यक वस्तू मिळणे कसे मुश्किल झाले आहे व नेत्यांची आश्वासने कशी खोटी ठरली आहेत याचे चित्रण आढळते.

'लवादाचा ऐका परकार' या रचनेत, कुठलाही पेचप्रसंग उभा राहिल्यावर लवाद (कमिशन किंवा आयोग) नेमण्याच्या सरकारच्या धोरणावर अण्णा भाऊ प्रखर टीका करतात. तितक्याच प्रखरपणे ते लवादाच्या कार्यपद्धतीवरही टीका करतात. लवाद हा नेहमी कामगारांच्या विरुद्ध जातो आणि मालकांच्या बाजूने निर्णय देतो, कारण मालकांचे व पिळवणूक करणारांचे हितरक्षण करण्यातच धन्यता मानणाऱ्या शासनाने त्याची नेमणूक केलेली असते.

'चिनी जनांची मुक्ति-सेना' या रचनेत नानकिंग शहराजवळ लढणाऱ्या कम्युनिस्ट सेनेच्या कामगिरीचे कौतुक केलेले आहे. ही घटना म्हणजे अण्णा भाऊंना एक ऐतिहासिक घटना वाटते, कारण या घटनेत त्यांना प्राचीन अशा विविध शृंखलांचा नाश आणि आशियातील इतर देशांसाठी प्रेरणेची बीजे दिसतात.

'लेनिन शुभनामाचे' या रचनेत रशियातील ऑगस्ट क्रांतीचे नेते लेनिन यांची प्रशंसा केलेली आहे. या रचनेत अण्णा भाऊ लेनिन यांना कामगारांच्या क्रांतीचे जनक व आंतरराष्ट्रीय क्रांतीचे नेते म्हणून संबोधतात.

## क. महाराष्ट्र आणि मराठी संस्कृती यांच्यावरील प्रशंसापर पद्यरचना

अण्णा भाऊंच्या पुढील पद्यरचना या गटामध्ये येतातः

1. शाहिरांनो!
2. महाराष्ट्र देश आमुचा
3. उठला मराठी देश
4. महाराष्ट्रावरुनी टाक ओवाळुन काया
5. माझी मैना गावावर राहिली
6. जग बदल घालुनी घाव
7. साताऱ्याची तऱ्हा

'शाहिरांनो!' ही रचना जरी काव्यरचना करणाऱ्यांना उद्देशून लिहिलेली असली, तरी या रचनेतील बऱ्याच मोठ्या भागात अण्णा भाऊ महाराष्ट्राच्या



कविपरंपरेचे वर्णन करतात. एकनाथ, तुकाराम, रामदास, या संतकवींपासून सुरुवात करून, पुढे ते सगनभाऊ, होनाजी बाळा या लोककवींचा व गोविंदाग्रज व केशवसुत यांच्यासारख्या आधुनिक नागरी कवींचाही उल्लेख करतात. अशा प्रकारे या रचनेत ते मराठी काव्यपरंपरेतील प्रमुख टप्प्यांचा आढावा घेतात. या रचनेच्या शेवटच्या कडव्यात ते आजच्या कवींना या परंपरेचा उपयोग आजच्या काळाला अनुरूप ठरेल अशा प्रकारे करण्याचे आवाहन करतात.

'महाराष्ट्र देश आमुचा' या रचनेत अण्णा भाऊंनी पुन्हा एकदा संत, तंत आणि पंत कवींच्या काव्यरचना, महाराष्ट्राची राजभाषा मराठी, महाराष्ट्राचा भूगोल अशा मराठी संस्कृतीच्या विविध पैलूंचे चित्रण केले आहे.

'उठला मराठी देश' ही रचना संयुक्त महाराष्ट्र चळवळीच्या पार्श्वभूमीवर लिहिलेली आहे. महाराष्ट्रावरील आपल्या इतर रचनांप्रमाणेच या रचनेतही शाहीर मुंबई महाराष्ट्राला मिळावी या मागणीसाठी मुंबईच्या रस्त्यांवर प्राण देणाऱ्या हुतात्म्यांची स्तुती करतात.

'महाराष्ट्रावरुनी टाक ओवाळुनी काया' ही रचनासुद्धा 'उठला मराठी देश' या रचनेप्रमाणेच संयुक्त महाराष्ट्र आंदोलनाच्या पार्श्वभूमीवर लिहिलेली आहे. आपल्या समृद्ध परंपरेपासून प्रेरणा घेऊन महाराष्ट्रवासियांनी संयुक्त महाराष्ट्रासाठी पूर्ण शक्तिनिशी लढावे आणि मृत्यूला तोंड द्यायची वेळ आली, तरी पाय मागे घेऊ नये असे आवाहन शाहीर अण्णा भाऊंनी महाराष्ट्रातील जनतेला केले आहे.

व्यक्तिगत दुःखाची सांगड योग्य प्रकारे एखाद्या सामाजिक-राजकीय समस्येशी कशी घातली जाऊ शकते, हे 'माझी मैना गावावर राहिली' या लावणीवरून दिसते. ही रचना अण्णा भाऊंच्या रचनांपैकी सर्वात लोकप्रिय रचना आहे व ती अनेकदा उद्धृत केली जाते. या लावणीमध्ये तीन प्रमुख विषय दिसतात, ते असेः

1. प्रियकराचे प्रेयसीच्या विरहाचे दुःख.
2. मुंबईच्या जीवनाचे चित्रण.
3. संयुक्त महाराष्ट्र जळवळ व मराराष्ट्र-कर्नाटक सीमेचा वाद.

इथे इतिहासातील एका तपशिलाचा उल्लेख करायला हवा. महाराष्ट्राने केंद्र सरकारविरुद्ध अतिशय तीव्र आंदोलन केल्यामुळे राज्यांच्या पुनर्रचनेच्या वेळी मुंबई महाराष्ट्राला मिळाली. हेच आंदोलन 'संयुक्त महाराष्ट्र आंदोलन' या नावाने ओळखले जाते. मुंबई जरी महाराष्ट्राला मिळाली, तरी बेळगाव, कारवार, निपाणी, डांग, उंबरगांव हे मराठीभाषिक प्रदेश महाराष्ट्रापासून अलग करण्यात आले व शेजारच्या

कर्नाटक राज्यात समाविष्ट करण्यात आले.

वर उल्लेख केलेल्या मराठी भाषिक प्रदेशांच्या वियोगाची तुलना शाहीर प्रियकराच्या प्रेयसीपासून झालेल्या वियोगाशी करतात - प्रेयसी गावाकडे राहिलेली आहे आणि प्रियकर खूप दूर, मुंबईमध्ये तिच्या विरहात जळत आहे. ही रचना त्यांनी 1960 मध्ये लिहिलेली असली, तरी महाराष्ट्र-कर्नाटक सीमाप्रश्नाचे घोंगडे अजूनही भिजत पडलेले आहे - बेळगाव वगैरे मराठीभाषिक प्रदेश अजूनही महाराष्ट्राबाहेरच आहेत. असे असले, तरी प्रेमिकांच्या वियोगाच्या व्यक्तिगत दुःखाची भौगोलिक प्रदेशांच्या वियोगाशी केलेली तुलना हा या रचनेतील आजही सर्वात मार्मिक भाग वाटतो.

भारतातील परिस्थितीमध्ये जातीला कुठलीही भूमिका नाही असे कम्युनिझममागे आंधळेपणाने जाणाऱ्यांप्रमाणे अण्णा भाऊंना वाटत नव्हते. हे त्यांच्या 'जग बदल घालुनी घाव' या रचनेतून दिसते. ही रचना डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या जीवितकार्याला अण्णा भाऊंनी वाहिलेली आदरांजली म्हणूनही मानली जायला हरकत नाही. काही पिसाट व श्रीमंत लोकांनी कशा प्रकारे दलितांची पिळवणूक केली, त्यांचा अपमान केला व त्यांच्यामध्ये फूट पाडून स्वामित्व गाजवले याचे अण्णा भाऊंनी या छोट्याशा रचनेत वर्णन केले आहे. या रचनेतून अण्णा भाऊ सर्व संबंधितांना आंबेडकरांच्या जीवितकार्यापासून प्रेरणा घेण्याचे व आंबेडकरांच्या संदेशानुसार घाव घालून जग बदलण्याचे आवाहन करतात.

महाराष्ट्र आणि मराठी संस्कृतीच्या विविध पैलूंचे चित्रण करणाऱ्या अण्णा भाऊंच्या काही रचना प्रस्तुत आलेखाच्या लेखकाला उपलब्ध झाल्या नाहीत. काही स्रोतांमध्ये या रचना अण्णा भाऊंनी लिहिल्या आहेत असा उल्लेख सापडतो. त्या रचना अशाः 'संयुक्त महाराष्ट्र येतसे पहा', 'महाराष्ट्राला मुजरा', 'हे आम्हावर लादले' आणि 'घडवी मराठा या महाराष्ट्रा'.

## ड. मुंबईबद्दलच्या कविता

अण्णा भाऊंच्या मुंबईवरील कविता या मुंबईतील जीवनाच्या समृद्धी आणि दारिद्र्य, झगमगाट आणि अंधःकार, सुसंस्कृतपणा आणि क्रौर्य अशा परस्परविरोधी बाजूंचे दर्शन घडवतात. पुढील दोन रचना मुंबईबद्दलच्या कविता या गटात येतातः

1. कथा मुंबईची.
2. मुंबईची लावणी.



'कथा मुंबईची' ही रचना मुंबईत शेजारी-शेजारी अस्तित्वात असणाऱ्या दोन अगदी विरोधी प्रकारच्या विश्वांचे दर्शन घडवते. ही दोन विश्वे म्हणजे अमाप समृद्धीचे विश्व आणि पराकोटीच्या दारिद्र्याचे विश्व. समृद्धीच्या विश्वाचे चित्रण करताना अण्णा भाऊ गगनचुंबी इमारती, रंगीबेरंगी मोटारगाड्या, आगगाड्या आणि प्रचंड श्रीमंत लोकांचे वर्णन करतात. पराकोटीची गरिबी चित्रित करताना ते झोपडपट्ट्या, अर्धनग्न लोक, अपंग भिकारी, गुदमरवून टाकणाऱ्या गर्दीच्या जागा, खिसेकापू, भुकेले लोक, वेडे, बेकार, पाणीटंचाई, नासलेली केळी खाणारी गरिबांची मुले आणि शेवटी मृत्यू यांचे वर्णन करतात.

'कथा मुंबईची' या कवितेचा विषयच अण्णा भाऊंनी 'मुंबईची लावणी' या लावणीत पुढे चालू ठेवला आहे असे दिसते. या दोन्ही कवितांमधील तपशील मानसिक आणि भावनिक भूमिका एकच आहे असेही जाणवते. 'मुंबईची लावणी' मध्ये समृद्धीची केंद्रे म्हणून अण्णा भाऊ श्रीमंतांची वस्ती असलेली मलबार हिल, उडणारी विमाने, रुंद रस्ते यांचे वर्णन करतात. गरिबीचे दर्शन घडवताना ते कष्टाची कामे करणारे लोक, टांग्याचे घोडे, हमाल, बेवारस मृतदेह, वाडिया आणि के.ई.एम्. या हॉस्पिटल्समधली रोग्यांची गर्दी, क्षय, गुप्तरोग, कॉलरा, ताप, खोकला या रोगांचे बळी यांचा उल्लेश करतात. मुंबईत 'माणसाला माणूस खातं' असे ते लाक्षणिक अर्थाने म्हणतात.

## इ. निसर्गवर्णपर कविता

ग्रामीण जीवनामध्ये निसर्गरम्य परिसर व धार्मिक वातावरण यांचा समावेश होतो. ग्रामीण जीवनाची ही वैशिष्ट्ये अण्णा भाऊंनी आपल्या कांही निसर्गवर्णनपर काव्यरचनांमध्ये उत्तमपणे चित्रित केली आहेत. या रचना अशाः

1. पूर्वेला जाग आली
2. रवि आला लावुनी तुरा
3. भाग्याची माऊली
4. जागरणाला या
5. दुनियेची दौलत सारी

'पूर्वेला जाग आली' ही पूर्णपणे निसर्गकविता आहे. अकरा ओळींच्या या कवितेत सूर्योदयाचे सौंदर्य चित्रित केले आहे. सूर्य उगवायच्या बेतात असताना पूर्व दिशा कशी लाल होते, ती संपूर्ण आकाशावर लाली कशी उधळते; शेते,

फुले, पाने, पक्षी आणि वारा हे सारे सूर्याबरोबर कसे जागे होत असलेले दिसतात याचे वर्णन या कवितेत केलेले आहे.

तपशिलांचे काही फरक वगळता, 'पूर्वेला जाग आली' आणि 'रवि आला लावुनी तुरा' या रचनांमध्ये विषयाच्या बाबतीत फारसा फरक नाही, कारण या दोन्ही कविता सूर्योदय आणि त्यावेळची प्रसन्नता याच नैसर्गिक घटनेबद्दलच्या आहेत. कृष्णा नदी सूर्योदयाच्या सोनेरी रंगात कशी रंगून गेली आहे, हरणे कशी 'चौखूर उडत' आहेत, कोकिळ कसा 'हसत' आहे, सप्तरंगांचा पिसारा फुलवून मोर कसा वनात नाचत आहे हे 'रवि आला...' या रचनेमधील अधिकचे तपशील आहेत.

वरील दोन कवितांप्रमाणेच 'भाग्याची माऊली' हीसुद्धा सूर्योदयावरील कविता आहे.

विविध दैवतांची पूजा करणे आणि त्यांच्या संदर्भातील धार्मिक विधी श्रद्धापूर्वक पार पाडणे हा ग्रामीण जीवनाचा अविभाज्य भाग असतो. हे आपल्या भारतातच नव्हे, तर जगभर दिसून येते. खंडेराया, खंडोबा, मल्हारी-मार्तंड अशा विविध नांवांनी ओळखला जाणारा पुणे जिल्ह्यातील जेजुरीचा खंडोबा हा महाराष्ट्रातील बऱ्याचशा जाती-जमातींचे कुलदैवत आहे. (या खंडोबावर आणि त्याच्या जेजुरी या गावावरच कवि अरुण कोलटकर यांनी आपली बहुचर्चित व प्रसिद्ध अशी 'जेजुरी' ही रचना लिहिलेली आहे). महाराष्ट्रीय जीवनाच्या या पैलूला अण्णा भाऊंनी 'जागरणाला या' शीर्षकाच्या रचनेतून स्पर्श केला आहे. धार्मिक विधींमध्ये भाग घ्यायला येण्यासाठी शाहिरांनी या कवितेतून खुद्द खंडोबालाच आवाहन केलेले आहे.

आपल्या शेतामध्ये पिकत असलेल्या पिकाचे दृश्य हे खऱ्या शेतकऱ्यासाठी जगातील सर्व संपत्तीच्या दृश्याप्रमाणेच असते. आपल्या श्रमांना पिकाच्या रूपात मिळालेले फळ पाहून आनंदित होणाऱ्या शेतकऱ्याच्या भावनेला अण्णा भाऊंनी 'दुनियेची दौलत सारी' या कवितेत शब्दरूप दिले आहे. ही कविता म्हणजे आपली शेते पिकांनी भरलेली पाहून प्रसन्न झालेल्या शेतकऱ्याचे जणू स्वगतच आहे.

## फ. कल्पनारम्य कविता

अण्णा भाऊंनी आपल्या जीवनाच्या सुरुवातीला तमाशामध्ये अभिनय केला, गाणी गायिली, तसेच लोकनाट्यांचे लेखनही केले. या कालखंडात त्यांनी बऱ्याच



कल्पनारम्य काव्यरचना केल्या असाव्यात, कारण तमाशाचे स्वरूप त्या काळी कल्पनाप्रधान असे. परंतु, दुर्दैवाने या रचनांपैकी खूप कमी रचना आज उपलब्ध आहेत. या उपलब्ध रचनांपैकी ज्या रचना कल्पनारम्य कविता या प्रकारामध्ये मोडू शकतात, त्या अशाः

1. गवळण
2. माझी मैना गावावर राहिली
3. बाई मी बांगडी मैना

भारतीय परंपरेत कृष्णाचा संबंध प्रणयाशी जोडला जातो. प्रत्येक तमाशाच्या सुरुवातीला 'गवळण' हा एक भाग असतो. यामध्ये काल्पनिक अशा 'मथुरेच्या बाजारा'ला दूध, दही, लोणी विकण्यासाठी निघालेल्या गवळणींची कृष्ण थट्टामस्करी करतो. कृष्णाला न ओळखल्याने सुरुवातीला गवळणी त्याने केलेल्या थट्टेबद्दल त्याचा अपमान करतात. तेव्हा कृष्ण काव्यमय भाषेत स्वतःचा परिचय करून देतो. यात ईश्वर म्हणून आपण केलेल्या मोठमोठ्या पराक्रमांचे तो वर्णन करतो. त्यामुळे गवळणी मंत्रमुग्ध होतात. त्याचा अपमान करण्यात आपली चूक झाली हे उमगून त्याची माफी मागतात, त्याच्या पायांवर लोळण घेतात आणि त्याला क्षमा करण्यासाठी विनवतात. याप्रमाणे तमाशाच्या सुरुवातीच्या या भागाची रचना असते. या भागालाच 'गवळण' असे म्हणतात. वेगवेगळे शाहीर आपापल्या पद्धतीने कृष्णाने करून दिलेली स्वतःची ओळख काव्यामधून लिहितात.

या प्रघातानुसार अण्णा भाऊंनी 'गवळण' या रचनेतून कृष्णाची ओळख आपल्या पद्धतीने लिहिली आहे. या ओळखीमध्ये कृष्ण आपण कुरुक्षेत्रावर अर्जुनाचे मार्गदर्शक होतो, गीतेचे निवेदक होतो, जरासंध व शिशुपाल यांचे कर्दनकाळ होतो, आपण विश्वाचे निर्माते, जगाचे नेते आणि देवकीचे पुत्र आहोत अशी स्वतःची ओळख करून देतो.

'माझी मैना गावावर राहिली' ही कविता महाराष्ट्राच्या इतिहासातील 'संयुक्त महाराष्ट्र आंदोलन' या महत्त्वाच्या टप्प्यावर लिहिलेली असूनही ही कविता प्रणयरम्य कविता आहे, कारण हिच्या बऱ्याच भागामध्ये कवीने आपल्या प्रेयसीच्या सौंदर्याचे वर्णन केलेले आहे व त्या दोघांना एकमेकांबद्दल वाटत असलेल्या प्रेमाचे हळुवार भाषेत चित्रण केलेले आहे.

'बाई मी बांगडी मैना' या कवितेत ग्रामीण भागातल्या तरुणीच्या नाजुकपणाचे वर्णन केलेले आहे. ती जणू एखाद्या काचेच्या बांगडीसारखी नाजुक आहे. तरुणीची तुलना ध्रुवतारा, चतुर्थीची चंद्रकोर, जगातील आश्चर्य यांच्याशी केली आहे.

## ग : राष्ट्रीय कविता

अण्णा भाऊंच्या पुढील काव्यरचना राष्ट्रीय भावनेचे चित्रण करणाऱ्या आहेतः

1. 'प्रथम मायभूच्या चरणा' हा 'गण'.
2. कटाव
3. भारताची पहिली दीपावली

पारंपरिक तमाशामध्ये आरंभी 'गण' गाऊन प्रयोगाची (खेळाची) सुरुवात करतात. परंपरेनुसार 'गणा' मध्ये गणपती व सरस्वती या दैवतांची प्रार्थना असते. या 'गणा'ला सुद्धा अण्णा भाऊंनी नवे वळण दिले, हे 'प्रथम मायभूच्या चरणा— या 'गणा' मधून दिसते. या 'गणा' मध्ये त्यांनी परंपरेप्रमाणे पुराणातील देवदेवतांची प्रार्थना केलेली नांही, तर छत्रपति शिवाजी महाराज, लोकमान्य टिळक, क्रांतिकारक अशा सांस्कृतिक दृष्ट्या महत्त्वाच्या व्यक्तींची 'सभापति, सुजन, कलावंत व रसिक' यांना स्फूर्ती देण्यासाठी प्रार्थना केली आहे.

अण्णा भाऊंनी आपला 'कटाव' काँग्रेसच्या राज्याचा उपहास करण्यासाठी लिहिलेला आहे. त्यांच्या मते काँग्रेस पक्ष लोकांना फसवीत होता आणि देशाच्या प्रगतीला बाधा आणीत होता. कटावात ते काँग्रेस सरकारच्या योजनांच्या डोंगराएवढ्या ढिगाचा, आश्वासनांच्या बरसातीचा आणि अहिंसेच्या तत्वाच्या दांभिक समर्थनाचा उल्लेख करतात. या योजना पूर्ण करण्याचा किंवा त्याची अंमलबजावणी करण्याचा कुठलाही प्रयत्न सरकार करीत नाही आणि एकही आश्वासन पाळीत नाही, हे सुद्धा ते नोंदवतात.

दीपावली हा तेजाचा आणि आनंदाचा उत्सव संपूर्ण भारतभर साजरा केला जातो. दीपावलीच्या प्रसंगी भाऊ-बहिणी परस्परांना दीर्घायुष्य व समृद्धी लाभो अशी कामना करतात. भाऊ बहिणीला भेटवस्तू देतो आणि बहीण आपल्या भावाला दीर्घ व समृद्ध जीवन लाभो अशी ईश्वराकडे प्रार्थना करते. दीपावलीची पारंपरिक भूमिका ही अशी असते. पण अण्णा भाऊ या पवित्र उत्सवाला राष्ट्रीय रंग देतात. 'भारताची पहिली दीपावली' या त्यांच्या कवितेतील बहीण केवळ भावालाच दीर्घायुष्य आणि समृद्धी चिंतीत नाही, तर भारताच्या स्वातंत्र्यलढ्याशी संबंधित व्यक्तींचे व प्रसंगांचेही स्मरण करते. शेवटी ती म्हणते की, भारतीय स्वातंत्र्याचा हा दीप प्रज्वलित करण्यासाठी करोडों लोकांनी बलिदान केले आहे - त्यामुळे आपण स्वातंत्र्याचा हा दीप विझू देता कामा नये.

'नानकिंग नगराकडे' हा पोवाडा, 'सुगी' ही काव्यरचना आणि आपल्या मातंग



समाजावरील कविता या रचना प्रस्तुत आलेख-लेखकाला उपलब्ध होऊ शकल्या नाहीत; पण काही स्रोत या रचना अण्णा भाऊंनी लिहिल्या आहेत असा उल्लेख करतात.



# 6

# प्रवासवर्णन व इतर संकीर्ण लेखन

आपल्या संपूर्ण साहित्यिक कारकीर्दीत अण्णा भाऊंनी 'माझा रशियाचा प्रवास' हे एकच प्रवासवर्णन लिहिले. हे प्रवासवर्णन म्हणजे 1961 मध्ये 'इंडो-सोव्हिएत कल्चरल सोसायटी'ने प्रायोजित केलेल्या त्यांच्या रशियाच्या प्रवासाचे वर्णन आहे. या पुस्तकात ते सांगतात की, जेव्हा या संस्थेने त्यांनी रशियाला भेट द्यावी असे ठरवले, तेव्हा त्यांच्याकडे पुरेसे पैसे नव्हते. पण जेव्हा त्यांच्या या संकल्पित भेटीची बातमी महाराष्ट्रात पसरली, आणि त्यांच्या या प्रवासासाठी आर्थिक मदत करण्याचे आवाहन करण्यात आले, तेव्हा महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातून त्यांच्यावर पैशांचा पाऊस पडला, आणि त्यांच्या प्रवासाचा 'निम्मा खर्च निवारला'.

विमानप्रवासाचा हा त्यांचा पहिलाच अनुभव होता. त्यामुळे ते घाबरलेले होते. त्यांना प्रथम मुंबईहून दिल्लीला विमानाने जायचे होते. दिल्लीमध्ये त्यांना प्रतिनिधिमंडळातील इतर प्रतिनिधींमध्ये सामील होऊन रशियात ताश्कंदला जायचे होते. तेथून रशियातील इतर शहरांना व प्रदेशांना भेटी द्यायच्या होत्या. जेव्हा त्यांच्या विमानाने मुंबईहून दिल्लीला व दिल्लीहून ताश्कंदला जाण्यासाठी उड्डाण केले, तेव्हा त्यांच्या मनाची जणू दोन ध्रुवांमध्ये ओढाताण होत होती. हे दोन ध्रुव म्हणजे मातृभूमी सोडण्याचे दुःख आणि सोविएत देश पहाण्याचे सुख.

अण्णा भाऊंचे बंधू शंकर भाऊ, पत्नी जयवंताबाई, शांता व शकुंतला या जयवंताबाईंच्या कन्या, शाहीर द. ना. गव्हाणकर, गणपत सातपुते, श्री. वैराळे असे अण्णा भाऊंचे अनेक नातेवाईक व मित्र त्यांना निरोप देण्यासाठी मुंबई विमानतळावर आले होते.

त्यांचे मित्र त्यांना अनेक सूचना करीत होते. तो काळ भारतातील रशियाविरोधी प्रचाराचा होता असे अण्णा भाऊंनी नोंदवले आहे. त्यामुळे रशियातील समृद्धीचा



प्रचार दिशाभूल करणारा आहे की काय आणि रशियाविरोधी प्रचारात तथ्य आहे काय हे पडताळून पहाण्यास त्यांचे मित्र त्यांना सांगत होते. मित्रांनी त्यांना पुढील गोष्टी पडताळून पहाण्यास सांगितले–

1. रशियात झोपड्या किती आहेत?
2. रशियात किती लोक बेघर आणि पुलाखाली रहाणारे असे आहेत?
3. 'पोलादी पडद्या'ची जाडी किती आहे? तो कुठल्या प्रकारचा आहे?
4. रशियात धर्म नाही हे खरे आहे का?
5. रशियात वंशभेद व वर्णभेद नाहीत का?
6. तिथे व्यक्तिस्वातंत्र्य आहे का?
7. तिथे बेकारी नाही हे खरे आहे का?

अण्णा भाऊ मुंबईहून विमानाने दिल्लीला गेले. तिथे ते कॉम्रेड श्रीपाद अमृत डांगे यांना त्यांच्या घरी जाऊन भेटले. श्री. डांगे हे प्रख्यात कम्युनिस्ट नेते तेव्हा खासदार होते. श्री. डांगे व सौ. उषाताई डांगे यांनी आपल्याला पुत्रवत् वर्तणूक दिली, हे अण्णा भाऊ कृतज्ञतापूर्वक नमूद करतात.

अण्णा भाऊ सहाजणांच्या प्रतिनिधिमंडळातील एक प्रतिनिधी म्हणून रशियाला निघाले होते. इतर पाच प्रतिनिधी असे होते – हैदराबादचे डॉ. शहा, म्हैसूरचे डॉ. दयालू, लखनौचे काँग्रेस आमदार श्री. पुष्कराज, कलकत्त्याचे एक वकील श्री. चटर्जी आणि मद्रासचे एक पियानोवादक श्री. जॉन.

या प्रतिनिधिमंडळात सामील झाल्यावर अण्णा भाऊंना एक कटु अनुभव आला. इतर प्रतिनिधींनी त्यांची उपेक्षाच केली. ताश्कंदमध्ये आल्यावरच त्यांनी अण्णा भाऊंची दखल घेतली व त्यांची क्षमा मागितली, कारण अण्णा भाऊ हे कुणी सामान्य गृहस्थ नसून संपूर्ण आशिया खंडात तसेच रशियातही सुपरिचित असलेले लेखक आहेत हे तेव्हा त्यांच्या लक्षात आले.

ताश्कंदमध्ये खूपच थंडी होती, पण रशिया पहाण्याच्या इच्छेने अण्णा भाऊंना इतके झपाटले होते, की आपल्या काखेत दाबून ठेवलेला ओव्हरकोट अंगात घालायचे भानही त्यांना राहिले नाही. त्यांचे स्वागत करण्यासाठी आलेल्या श्रीमती कझकीना या रशियन महिलेने आपल्या हाताने त्यांच्या अंगावर ओव्हरकोट कसा घातला हे ते कृतज्ञतापूर्वक नोंदवतात.

रशियातील भारतीय वकिलातीला दिलेली भेट व तेथील भारतीय वातावरण यांचेही वर्णन अण्णा भाऊ करतात.

लेनिनग्रादपर्यंत केलेल्या रेल्वेप्रवासाचे वर्णन करताना ते अप्रत्यक्षपणे

रशियातील रेल्वे स्थानके, तेथील सुव्यवस्था व प्रवासी यांची भारतातील रेल्वे स्थानकांशी, अव्यवस्थेशी व बेशिस्त प्रवाशांशी तुलना करतात, व रशियन रेल्वे ही भारतीय रेल्वेपेक्षा कितीतरी पटींनी उत्तम आहे असे सांगतात.

लेनिनग्रादमध्ये ते अनेक व्यक्तींना भेटतात. त्यांच्यापैकी महत्त्वाच्या व्यक्ती म्हणजे रशियामध्ये मराठी शिकवणाऱ्या व मराठी-रशियन शब्दकोश तयार करणाऱ्या प्रा. ततियाना कातेनिना, व लेनिनग्राद युनिव्हर्सिटीत मराठी शिकणारे प्रा. कातेनिना यांचे विद्यार्थी. ऐतिहासिक विंडसर पॅलेसला भेट, कॉम्रेड लेनिन यांच्या खोलीतील प्रवेश, लेनिनग्रादजवळ असलेल्या व 1942 सालच्या नाझी हल्ल्यापासून लेनिनग्रादचे रक्षण करताना हुतात्मे झालेल्या रशियन सैनिकांच्या स्मारकानजीक असलेल्या 'शांति-उद्याना'ला भेट यांचेही वर्णन अण्णा भाऊ करतात. त्यांचे दुभाषी म्हणून नेमणूक झालेल्या कॉम्रेड पी. ए. बारनिकोव यांनाही ते लेनिनग्रादमध्ये भेटतात.

रशियन लोकांबद्दल अण्णा भाऊ म्हणतात की, त्यांना इतिहासाची जाण आहे. ते यंत्रांचे गुलाम नाहीत; उलट यंत्रांनाच त्यांनी आपले गुलाम बनवले आहे. ते उद्योगी आहेत. शांतताप्रिय आहेत, पण दुबळे नाहीत - गरज पडल्यास ते आपले शौर्य दाखवू शकतात. त्यांना संस्कृतीची व कलेची जाण आहे. ते नम्र, सभ्य व विचारी आहेत. रशियातील कारखाने व कला यांच्यावर त्यांचे सारखेच प्रेम आहे.

रशियन लोकांचा प्रामाणिकपणा व शिस्तबद्धपणा यांची प्रशंसा करताना, आपला एक अनुभव ते नमूद करतात. ते आपला कॅमेरा आणि काही वस्तू टॅक्सीमध्ये विसरले होते, पण शासकीय यंत्रणेने हस्तक्षेप करण्यापूर्वी त्या टॅक्सी ड्रायव्हरनेच अण्णा भाऊंच्या वस्तू स्वतः होऊन त्यांना परत केल्या.

मॉस्कोमध्ये लाल चौकात अण्णा भाऊंनी एक जुने चर्च पाहिले. अनेक भाविक त्या चर्चमध्ये जाऊन प्रार्थना करताना त्यांना दिसले. त्याचप्रमाणे अझरबैजानमधील बाकू नांवाच्या गावी त्यांना मशिदी आणि त्यांच्यामध्ये नमाझ पडणारे मुस्लिम दिसले. या गोष्टींमुळे 'रशियातून धर्म व ईश्वर यांना हद्दपार करण्यात आले आहे' हा रशियाविरोधी प्रचार खोटा आहे असे त्यांच्या लक्षात आले.

मास्कोमध्ये अण्णा भाऊंनी रशियन लोकांपुढे मराठीत भाषण केले. त्याचा ताबडतोब इंग्लिशमध्ये व इंग्लिशमधून रशियनमध्ये अनुवाद करण्यात आला. भाषणानंतर ते प्रा. येवगेनी चेलिशेव यांना भेटले. प्रा. चेलिशेव यांनी रशियन भाषेत लोकमान्य टिळक व पंडित जवाहरलाल नेहरू यांची चरित्रे लिहिली होती



व छत्रपती शिवाजी महाराजांचे चरित्र ते रशियनमध्ये लिहीत होते. ते महाराष्ट्रात येऊन गेले होते, त्यांना हिंदी उत्तम बोलता येत होते आणि पुण्यातील सदाशिव पेठ, शनिवार पेठ, शिवाजीनगर असे अनेक भाग तसेच रस्ते व गल्ल्या त्यांना चांगल्या ठाऊक होत्या. रामायण, महाभारत ही महाकाव्ये तसेच रवीन्द्रनाथ टागोरांचे साहित्य यांचे रशियनमध्ये अनुवाद झालेले आहेत व ते रशियन लोकांकडून वाचले जात आहेत हेसुद्धा अण्णा भाऊ नोंदवतात.

रशियातून प्रवास करताना समृद्धीबरोबरच तिथे गरिबीही दिसते का याचा ते आधी ठरवल्याप्रमाणे शोध घेत होते. पण त्यांना एकही गरीब माणूस दिसला नाही. यावरून त्यांनी निष्कर्ष काढला की, रशियात गरिबी नाही. अण्णा भाऊंची अशी खात्री होती की, एखादे धूर्त शासन डोंगराएवढे सत्यसुद्धा लपवून ठेवू शकते; पण गरिबी मात्र लपवू शकत नाही, कारण गरिबी खूप क्रूर आणि नग्न असते.

रशियात स्त्रियांना पुरुषांइतकाच मान दिला जातो असे त्यांना दिसले. महिलांवरील जुनी बंधने रद्द करण्यात आली होती व त्या स्वतंत्र व्यक्ती म्हणून स्वाभिमानाने जगत होत्या. अण्णा भाऊंनी नोंदवलेल्या उझबेकिस्तानमधील प्रगतीवरून हे लक्षात येते. पूर्वी तेथे 'पर्दा' प्रथा होती, पण कम्युनिस्ट राजवटीने ती पद्धत पूर्णपणे बंद केली आणि तेथील स्त्रिया जीवनाच्या सर्व क्षेत्रांत भाग घेण्यास स्वतंत्र झाल्या. रशियाचे एक राज्य असलेल्या उझबेकिस्तानच्या राष्ट्रपतिपदी एक उझबेकी महिला आहे हे पाहिल्यावर अण्णा भाऊंची याबद्दल खात्री पटली.

रशिया हा देश आपल्याला प्रत्यक्ष पहायला मिळाला याचा अण्णा भाऊंना खूप आनंद झाला. रशिया पहायला मिळला नसता, तर आपल्या जीवनात मोठी पोकळी राहिली असती असे ते नोंदवितात. हजारो मैलांचा हा प्रवास विमान आणि रेल्वेने अतिशय आरामशीरपणे पूर्ण केल्यावर अण्णा भाऊंना आपल्या आयुष्यातील पराकोटीच्या गरिबीचे दिवस आठवले - त्यांना आणि त्यांच्या आई-वडिलांना व बहीण-भावांना वाटेगावहून मुंबईला जाताना सुमारे दोनशे सत्तावीस मैलांचे अंतर पायी चालावे लागले होते, कारण बस किंवा रेल्वेचे तिकीट विकत घेण्याइतकेसुद्धा पैसे त्यांच्याकडे नव्हते.

अण्णा भाऊ हे स्वतः कम्युनिस्ट होते, तरीसुद्धा हे प्रवासवर्णन त्यांनी अगदी समतोलपणे लिहिलेले आहे असे सुजाण वाचकांना जाणवते. त्यांच्या काळी चालू असलेला रशियाविरोधी प्रचार हा पूर्णपणे खोटा व दिशाभूल करणारा होता हेसुद्धा अण्णा भाऊ या प्रवासवर्णनातून सिद्ध करण्याचा प्रयत्न करतात.

## वृत्तांतलेखन

अण्णा भाऊंना अष्टपैलू व्यक्तिमत्त्व लाभले होते. त्यांनी फक्त कथा-कादंबऱ्याच लिहिल्या असे नाही, तर वृत्तपत्रांसाठी व नियतकालिकांसाठी वृत्तांतसुद्धा लिहिले. 1942 पासून पुढे त्यांनी कम्युनिस्ट पक्षाच्या 'लोकयुद्ध', 'लोकसाहित्य' व 'युगांतर' या साप्ताहिकांसाठी वार्ताहर म्हणून काम केले. सुरुवातीच्या काळात त्यांनी 'लोकयुद्ध'साठी नियमितपणे वार्ताहर म्हणून काम केले. त्यामुळे या साप्ताहिकाच्या काही अंकामध्ये त्यांचा उल्लेख 'विशेष प्रतिनिधी' म्हणून केलेला आढळतो. या वृत्तांताच्या विषयांना काही ठाम अशी दिशा नसली, तरी जे विषय अण्णा भाऊंनी वारंवार हाताळलेले दिसतात, ते असे – झोपडपट्टीत रहाणाऱ्या कामगारांचे भयानक जीवन, दुष्काळ, काळाबाजार, जीवनावश्यक वस्तूंची भाववाढ, भ्रष्टाचार व त्यामुळे आर्थिक दृष्ट्या दुर्बल असलेल्या ग्रामीण व नागरी भागातील लोकांना होणारा नाहक त्रास, कामगारांवर कंत्राटदार, मालक व भांडवलदार यांनी केलेले अत्याचार, कायदा आणि सुव्यवस्थेची झालेली दैना; संप, मोर्चे, टाळेबंद्या, पक्षाच्या सभा व अधिवेशने.

'लोकयुद्ध' साप्ताहिकाच्या 16 जुलै 1944 रोजीच्या अंकात त्यांनी 'दलितांची अन्नान्न दशा' हा वृत्तांत लिहिलेला दिसतो. सातारा जिल्ह्यातील आपले जन्मगाव वाटेगाव व आसपासच्या भागात दुष्काळाने घातलेल्या थैमानाचे त्यांनी या वृत्तांतात हृदयस्पर्शी भाषेत वर्णन केले आहे.

'लोकयुद्ध' च्या 7 एप्रिल 1946 च्या अंकात त्यांना व लाल बावटा कलापथकातील त्यांच्या सहकाऱ्यांना झालेल्या अटकेचा वृत्तांत आहे. त्यांचा कुठलाही गुन्हा नसताना विदर्भातील चांदर पोलिस स्टेशनने त्यांना अटक केली व त्यांच्यावर चोरी केल्याचे व दरोडा घातल्याचे आरोप ठेवण्यात आले. हे सारे केवळ अण्णा भाऊ व त्यांचे सहकारी हे तत्कालीन सत्तारूढ पक्षाचे नसल्याने व ते लोकांना त्यांच्या पिळवणुकीची व सरकार त्यांच्या अज्ञानाचा फायदा घेत असल्याची जाणीव करून देत असल्यामुळे करण्यात आले.

10 ऑक्टोबर 1947 रोजी अण्णा भाऊंनी आपला 'अमळनेरचे अमर हुतात्मे' हा पोवाडा पुण्यात जाहीरपणे गायिल्याने त्यांना अटक करण्यात आली. पुणे कारागृहातूनच त्यांनी या घटनेचा वृत्तांत 'मोरारजींच्या राज्यात गाण्याला बंदी' या शीर्षकाने लिहिला. (मोरारजी तेव्हा मुंबई प्रांताचे मुख्यमंत्री होते.) याचा परिणाम म्हणून, अण्णा भाऊ तुरुंगातून सुटल्यावर पुण्यात त्यांचा प्रख्यात इतिहासकार



व लेखक महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला.

## मुलाखती, लेख, भाषणे, स्तंभलेखन व परीक्षणे

मुलाखतींमध्ये अण्णा भाऊंनी घेतलेल्या इतरांच्या मुलाखती व त्यांनी इतरांना दिलेल्या मुलाखतींचा समावेश होतो.

अण्णा भाऊंनी घेतलेल्या इतरांच्या मुलाखतींमधून त्यांचा श्रमिकांबद्दलचा कळवळा व बांधिलकी दिसते. त्यांनी ज्यांच्या मुलाखती घेतल्या, त्यांच्यामध्ये कामगार, शेतमजूर, धनगर, शेतकरी, भिकारी, बलात्कारित स्त्रिया, अन्याय झाल्यामुळे गुन्हेगार बनलेल्या व्यक्ती अशा पददलित व्यक्तींचा समावेश आहे. या मुलाखतींमधून त्यांची अन्यायाबद्दलची चीड दिसते, त्याचप्रमाणे प्रतिभासुद्धा दिसून येते.

त्यांनी काही लेखही लिहिले. या लेखांमध्ये त्यांनी शाहीर अमर शेख व शाहीर द. ना. गव्हाणकर यांच्यासारख्या आपल्या सहकाऱ्यांच्या वाढदिवसांच्या निमित्ताने लिहिलेले लेख, आचार्य अत्रे यांच्या 'मराठा' या दैनिकाच्या तिसऱ्या वर्धापनदिनानिमित्त लिहिलेला लेख व घाटकोपर येथे दरड कोसळून तिच्याखाली गाडल्या गेलेल्या कामगारांबरील मृत्युलेख या लेखांचा समावेश होतो. याच दरड कोसळण्याच्या घटनेवर त्यांची 'चंदन' ही कादंबरी आधारलेली आहे.

आपल्या लेखनप्रक्रियेबद्दल त्यांनी 'मी कथा कशी लिहितो?' हा लेख लिहिला आहे. पुणे येथे झालेल्या पहिल्या दलित साहित्य संमेलनावरही त्यांनी लेख लिहिला आहे. ते या संमेलनाचे निमंत्रक होते व त्या नात्याने संमेलनात त्यांनी आपले लेखी भाषणही सादर केले होते. या भाषणातच त्यांनी आपले सर्वांत प्रसिद्ध असलेले विधान केले: 'हे जग, ही पृथ्वी शेषाच्या मस्तकावर नसून दलिताच्या तळहातावर तरलेली आहे.'

'युगांतर' या साप्ताहिकात त्यांनी बराच काळ 'वाट्टेल ते' आणि 'हवे ते' ही सदरे लिहिली. या सदरांतील काही लेखांमधून त्यांनी साहित्याबद्दलची धारणा व दृष्टिकोन स्पष्ट होतात. दोन प्रसंगी ते नवोदित लेखकांना, जे चांगले व सुंदर आहे त्याची भलावण करणे व जे विकृत व वाईट आहे त्याचा धिक्कार करणे ही आपली जबाबदारी आहे याची जाणीव ठेवण्यास सांगतात.

अण्णा भाऊंनी केलेली काही भाषणे व दिलेल्या काही मुलाखतीसुद्धा उपलब्ध आहेत. त्यांनी ज्या विषयांवर व ज्या प्रसंगी भाषणे केली, त्यांच्यापैकी महत्त्वाचे

विषय व प्रसंग असेः जातीय दंगली, संयुक्त महाराष्ट्र, तमाशा आणि लोकनाट्य यांच्यामधील फरकाचे स्पष्टीकरण, विविध राजकीय पक्षांचे जाहिरनामे व निवडणूक दौरे.

अण्णा भाऊंनी दोन पुस्तकांची परीक्षणेही लिहिली आहेत. टॉल्स्टॉयच्या 'क्राइम अॅण्ड पनिशमेंट' कादंबरीच्या मराठी अनुवादाच्या परीक्षणात त्यांनी टॉलस्टॉयला मानवी मनाची जी सखोल जाण होती, तिची प्रशंसा केली आहे.

स्वतः एक कामगार असलेले मार्क्सवादी कवी गणेश इंदोरी यांच्या 'मानव की ललकार' या हिंदी कवितासंग्रहाचे परीक्षणही अण्णा भाऊंनी लिहिले आहे. या कविता बेकारी व बेकारीमुळे घडणारी उपासमार यांच्यासारख्या ज्वलंत प्रश्नावरील आहेत. अण्णा भाऊ या कवीचे मनःपूर्वक स्वागत करतात व म्हणतात, 'व्यावसायिक कवीने लिहिलेल्या पंचवीस हजार ओळींपेक्षा कामगाराने लिहिलेली एक कविता अधिक मौल्यवान असते.' याच परीक्षणात त्यांनी आधुनिक मराठी कवितेमधल्या दुर्बोधतेवरही टीका केली आहे.

पुस्तकांप्रमाणेच काही चित्रपटांचीही परीक्षणे त्यांनी लिहिली. के. ए. अब्बास यांच्या 'चार दिल चार राहें' या चित्रपटाचे त्यांनी लिहिलेले परीक्षण एक उल्लेखनीय परीक्षण आहे. हा चित्रपट समाजवादाच्या तत्त्वज्ञानावर आधारलेला आहे. चित्रपटाच्या तात्त्विक पायाच्या विश्लेषणाबरोबरच त्यांनी या चित्रपटाची कथा, छायाचित्रण, संगीत, गाणी, संवाद, प्रस्तुतीकरण व परिणाम यांचेही विश्लेषण केले आहे.

वर चर्चा केलेले अण्णा भाऊंचे सर्व प्रकारचे संकीर्ण लेखन विचारात घेता, त्या लेखनात आपल्याला अण्णा भाऊंचा अष्टपैलूपणा व जीवनाच्या विविध क्षेत्रांमध्ये त्यांनी घेतलेले जिवंत अनुभव यांचे दर्शन घडते.



# 7

# निष्कर्ष

अण्णा भाऊंनी मराठी साहित्याला व संस्कृतीला दिलेल्या योगदानाचे मूल्यमापन करण्याच्या दृष्टीने, त्यांच्या आगमनापूर्वी मराठी साहित्याची स्थिती कशी होती हे पहाणे आवश्यक ठरते. अण्णा भाऊंच्या पूर्वीचा कालखंड पहाता असे दिसते की, वारकरी संतांचा अपवाद वगळता मराठी साहित्य हे बहुतांशी नागरी लोकांकडूनच लिहिले व वाचले जात होते.

दुसरे म्हणजे, आधुनिक मराठी साहित्यातील बरेचसे साहित्यप्रकार हे इंग्रजी शिकलेल्या मराठी लेखकांनी मराठीत आणले. उच्च शिक्षणाच्या सोयी बराच काळ फक्त मोठ्या शहरांमध्येच उपलब्ध असल्याने अण्णा भाऊंच्या आगमनापूर्वी मराठी साहित्य हे नागरी भागात व तिथे रहाणाऱ्या मध्यमवर्गाभोवतीच केंद्रित झाले होते.

स्वातंत्र्यासाठी राष्ट्रीय चळवळ सुरू झाल्यावर व महात्मा गांधींनी 'खेड्यांकडे चला' अशी घोषणा दिल्यावर, मूलतः नागरी भागात वाढलेल्या काही लेखकांनी, ज्याला 'प्रादेशिक साहित्य' म्हणता येईल, असे साहित्य लिहायला सुरुवात केली. श्री. म. माटे, ग. ल. ठोकळ, मालतीबाई बेडेकर यांनी ग्रामीण भागातील व्यक्तिरेखा, ग्रामीण वातावरण, प्रसंग यांच्याबद्दल प्रथमच मराठीत लिहिले. असे असले, तरीही या लेखकांना स्वतःच्या नागरी व मध्यमवर्गीय पार्श्वभूमीमुळे व ग्रामीण जीवनाच्या प्रत्यक्ष अनुभवाच्या अभावामुळे खूपच मर्यादा होत्या. त्यांच्यापैकी कुणाकडेही ग्रामीण वातावरण व संस्कृती यांचे सर्व छटांनिशी समर्थ चित्रण करण्याचे सामर्थ्य नव्हते.

या पार्श्वभूमीवर अण्णा भाऊंचा महाराष्ट्राच्या ग्रामीण जीवनाचे व संस्कृतीचे पहिले प्रमुख चित्रणकर्ते म्हणून उदय झाला, कारण त्यांना या जीवनाचे व संस्कृतीचे प्रत्यक्ष ज्ञान होते तसेच अनुभवही होता. त्यांनी आपल्या कथा-कादंबऱ्यांत चित्रित

केलेले वातावरण व व्यक्तिरेखा या अत्यंत जिवंत, खऱ्याखुऱ्या व सुस्पष्ट वाटतात. 1942 ते 1950 या कालखंडात त्यांनी लोकनाट्य, लावणी, पोवाडे असे वाङ्मयप्रकार हाताळले. या साऱ्या रचना मुख्यतः रंगमंचावर सादर करण्यासाठी व प्रचारासाठी वापरण्यात आल्या.

असे असले, तरी 1951 मध्ये 'वारणेच्या खोऱ्यात' या पुस्तकाच्या प्रकाशनाबरोबर ते एक प्रमुख लेखक म्हणून ओळखले जाऊ लागले. येथून पुढे त्यांनी मुख्यत्त्वे लघुकथा आणि कादंबऱ्या लिहिल्या. आपल्या कथा-कादंबऱ्यांमधून त्यांनी नवीन विषय व नवीन संघर्ष चित्रित केले. त्यांच्या आगमनापर्यंत मराठी साहित्यात कधीही न दिसलेले ग्रामीण व संघर्षमय जीवन हे त्यांनी आपल्या लेखनाच्या केंद्रस्थानी ठेवले. मराठी साहित्यात या विषयांना पूर्वी कुणाही लेखकाने महत्त्व दिले नव्हते. मराठी साहित्याचे केंद्र आता केवळ गावाकडेच नव्हे, तर वाड्या-वस्त्यांच्या दिशेने सरकू लागले. या वाड्या-वस्त्या होत्या दलितांच्या, झोपडपट्टीवासियांच्या, आदिवासींच्या आणि भटक्यांच्या. इतर कुणीही न मळवलेल्या या वाटेवरचे अण्णा भाऊ हे बहुधा पहिलेच पथिक होते. त्यांनीच साहित्याला सामान्यजनांपर्यंत नेले, व त्यामधून मराठी साहित्यविश्वात दलित साहित्याला स्थान मिळवून दिले आणि त्याची दिशा निश्चित केली.

त्या काळपर्यंत मराठी साहित्यसमीक्षेने आपली साधने तत्कालीन निकषांप्रमाणे फक्त नागरी व मध्यमवर्गीय साहित्याचेच विश्लेषण करण्यासाठी वापरलेली असल्याने अण्णा भाऊंचे लेखन त्यांच्यापैकी कुठल्याही प्रस्थापित वर्गवारीत मोडत नव्हते. त्याने टीकाकारांपुढे एक गंभीर आव्हान उभे केले. थोडक्यात, अगदी अलीकडेपर्यंत त्यांचे लेखन तथाकथित प्रस्तापित मराठी समीक्षेच्या परिघाबाहेरच राहिले.

अण्णा भाऊंच्या लेखनाची मराठी टीकाकारांनी बराच काळ दखल घेतली नाही याचे दुसरे व तितकेच महत्त्वाचे कारण म्हणजे अण्णा भाऊंनी केलेला कम्युनिस्ट राजकीय व आर्थिक विचारसरणीचा स्वीकार. ही विचारसरणी स्वीकारून ते तिचा उत्साहाने प्रचार करीत असल्याने बऱ्याच मराठी टीकाकारांनी त्यांना बेकार लेखक ठरवले. असे असले, तरी अण्णा भाऊंनी धाडसाने व धीराने ही अवहेलना व तिच्यातून येणारी कटुता सहन केली. लेखक म्हणून असलेला स्वतःचा आत्मविश्वास ढळू दिला नाही. मराठी टीकाकारांच्या कुठल्याही कंपूचे लांगूलचालन न करता त्यांनी आपले लेखन चालू ठेवले.

त्यांच्या लेखनाची अशी अवहेलना झाली, तरी आपल्या आत्मविश्वासाच्या



बळावर त्यांनी सुमारे तीस कादंबऱ्या व बावीस कथासंग्रह लिहिले व त्यांच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. त्यांच्या साहित्याचे केवळ भारतातच नव्हे, तर जगातील अनेक देशांमध्ये कौतुक झाले. त्यांच्या दूरवर पसरलेल्या लोकप्रियतेमुळे त्यांची बरीच पुस्तके चौदा भारतीय भाषांबरोबरच झेक, पोलिश, जर्मन, फ्रेंच, स्लोव्हाक व रशियन या प्रमुख विदेशी भाषांमध्येही अनुवादित झाली. 1961 साली त्यांच्या 'फकिरा' या प्रसिद्ध कादंबरीला महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट साहित्याबद्दलचा राज्य पुरस्कार मिळाला.

दलित चळवळीमध्ये वैचारिक बांधिलकीनुसार अनेक गट असले, तरी कुठल्याही गटाने दलित साहित्याच्या क्षेत्रातील अण्णा भाऊंच्या मूलभूत कार्याचे महत्त्व नाकारलेले नाही. त्यांना मराठी साहित्यातील पहिले प्रमुख, लक्षणीय व समर्थ दलित लेखक मानले जाते.

त्यांनी केलेले समाजजीवनाचे चित्रण खूपच वास्तववादी आहे. आपल्या भोवतीच्या समाजाचे त्यांनी तंतोतंत, अगदी छायाचित्राप्रमाणे चित्रण केले आहे. ते हे करू शकले, कारण ते स्वतः त्या समाजाचे एक घटक होते, व दुसरे म्हणजे आपल्या समाजाशी, त्याच्या सुखदुःखांशी, त्यातील चांगल्या-वाईटीशी ते एकरूप झाले होते. माणसाचे विरूपीकरण करणे किंवा त्याचे विकृत चित्रण करणे त्यांना कधीच आवडले नाही. त्यांनी समाजातील ज्या गटांचे चित्रण केले, ते बहुतांशी दलित, मागासलेले, अज्ञानात खितपत पडलेले व अस्पृश्य मानले जाणारे असे मांग, चांभार, भटके, कंजारी, कोल्हाटी, तसेच कलाकार व शेतकरी आहेत.

अण्णा भाऊंच्या साहित्यातील बऱ्याचशा व्यक्तिरेखा घाम गाळून आपली चटणी-भाकरी मिळवतात. त्यामुळे त्यांना संघर्षाची भीती वाटत नाही. त्यामुळेच, त्यांच्यापैकी बरेच जण कुठल्या-ना-कुठल्या प्रकारचा संघर्ष करीत असतात. अण्णा भाऊंच्या लेखनाच्या या पैलूवर भर देत मराठीतील पहिले ज्ञानपीठ पुरस्कार विजेते साहित्यिक श्री. वि. स. खांडेकर यांनी 'फकिरा'च्या प्रस्तावनेत लिहिले, 'अण्णा भाऊंचे साहित्य जगण्यासाठी मरायला तयार असलेल्या व्यक्तिरेखांनी भरलेले आहे. ते स्वातंत्र्यप्रेमी आहेत. म्हणजेच, त्यांना बंड करून आपल्या भोवती असलेली बंधने तोडावीशी वाटतात.'

अण्णा भाऊंच्या साहित्यातील खलनायक ठराविक प्रकारचेच असतात. ग्रामीण भागातले खलनायक म्हणजे सावकार, जमीनदार, गुंड, डाकू, गुन्हेगार व चमचे असे असतात, आणि त्यामुळेच ते वर्णव्यवस्थेचे व जातिभेदाचे पाठीराखे असतात.

अण्णा भाऊंनी केलेले स्त्रियांचे चित्रण उदात्त असे आहे, व ते भारतीय दृष्टिकोनाशी सुसंगत आहे. त्यांच्या साहित्यकृतींतील स्त्रियांच्या जवळ-जवळ सर्वच व्यक्तिरेखा आपले शील जपण्यासाठी संघर्ष करीत असताना दिसतात. शीलभ्रष्ट होण्यापेक्षा मरण परवडले असा त्यांचा दृष्टिकोन असतो. स्त्रियांचे वर्णनही अण्णा भाऊ सभ्यतेच्या मर्यादा पाळून करतात, ते कधीही कामुकतेकडे झुकत नाही.

त्यांनी आपल्या साहित्यकृतींमध्ये केलेले ग्रामीण जीवनाचे चित्रण त्यांच्या स्वतःच्या अनुभवांवर आधारलेले आहे. आपल्या साहित्यामध्ये त्यांनी जो भौगोलिक विभाग चित्रित केला आहे, तो म्हणजे पश्चिम महाराष्ट्रातील सांगली, सातारा आणि कोल्हापूर या जिल्ह्यांचा भाग. त्यांच्या लेखनात दिसणारा पर्वत आहे सह्याद्री आणि नद्या आहेत कृष्णा, कोयना, वेरळा, पंचगंगा, वांग आणि वारणा. त्यांनी चित्रित केलेला ग्रामीण समाज हा नैसर्गिक प्रतिकूलता, आर्थिक चणचण आणि शिक्षणाचा अभाव यांनी ग्रासलेला आहे.

अण्णा भाऊंनी रेखाटलेल्या या जीवनाची आणखी काही वैशिष्ट्ये म्हणून पुढील गोष्टींचा उल्लेख करता येईलः दऱ्या, पाऊस, वळणावळणाच्या वाटा व रस्ते, दाट जंगले, पिके, विहिरी, सर्व प्रकारच्या पिळवणुकीविरुद्ध बंडखोरांनी उठवलेला आवाज व निर्माण केलेला दरारा, सामूहिक आणि वैयक्तिक भांडणे, गुंडांचा स्त्रियांना होणारा उपद्रव, त्यांनी गुंडांना शिकवलेले धडे, पिढ्यानपिढ्या चालणारे दोन घराण्यांमधले वाद, उत्सव, खंडोबा, जोतिबा, बहिरोबा अशा ग्रामदैवतांच्या जत्रा, अस्पृश्य समाजांची व महिलांची दैना व तमाशातील नर्तकी. अर्थात् ही केवळ काही निवडक उदाहरणे झाली.

त्यांच्या साहित्यकृतींमधील व्यक्तिरेखा पुढील तीन प्रमुख मूल्ये जपण्याचा प्रयत्न करीत असताना दिसतात–

1. देशाचे स्वातंत्र्य
2. महिलांचे शील, आणि
3. पुरुषांचा स्वाभिमान.

अण्णा भाऊंचे साहित्यक्षेत्रातील कर्तृत्व आणि योगदान यांचा थोडक्यात सारांश सांगायचा झाल्यास असे म्हणता येईल, की ते अपवादात्मक अशा अष्टपैलूपणाचे व साहित्यिक सामर्थ्याचे धनी होते. त्यांनी जरी अनेक साहित्यप्रकार हाताळले असले, तरी त्यांची मूळ प्रकृती ही लघुकथालेखकाची होती. अनेक नवीन विषयांची जणू खाणच त्यांनी मराठी साहित्यात उघडली आणि मराठी साहित्याचे केंद्र नागरी मध्यमवर्गाकडून ग्रामीण जनतेकडे व अस्पृश्य, दलित, भटके व आदिवासी यांच्याकडे वळवले.



हलक्या मानल्या जाणाऱ्या 'तमाशा'चे रूपांतर 'लोकनाट्या'मध्ये केले, ते अण्णा भाऊंनीच. लोकनाट्याला प्रतिष्ठा, गांभीर्य आणि सामाजिक मान्यता मिळाली, कारण अण्णा भाऊंनी त्यात अनेक नवीन व चांगल्या गोष्टींचा समावेश केला. 'तमाशा' या कलेला आपला परीसस्पर्श करून त्यांनी बदलत्या काळातही तग धरून रहाण्यास समर्थ बनवले.

लोक रोजच्या जीवनात, विशिष्ट वर्तुळात व विशिष्ट प्रसंगी जी भाषा वापरतात, त्या भाषेचा 'कान' अण्णा भाऊंना होता, हे त्यांचे साहित्य वाचताना जाणवते. त्यांच्या भाषाशैलीची मुळे बोलीभाषेमध्ये ठामपणे रुजलेली आहेत, व या वैशिष्ट्याने त्यांच्या साहित्यकृतींना सुंदर व आकर्षक बनवले आहे. त्यांच्या साहित्याला लाभलेल्या अपार लोकप्रियतेचेही कारण हेच आहे. या लोकप्रियतेची तुलना वारकरी पंथातील संतकवींच्या काव्याला लाभलेल्या लोकप्रियतेशीच करता येईल.

अण्णा भाऊंच्या साहित्याचे हे सारे पैलू, त्यांचे मराठी साहित्यातील स्थान व लोकप्रियता लक्षात घेता काही टीकाकारांना वाटते, की ते मराठीतील संतकवी तुकाराम यांच्या खूप जवळ जातात – एरवीही अण्णा भाऊंचे मूळ नांव होते, ते 'तुकाराम' हेच!



## 8

# शब्दार्थ - सूची

अभंग : अभंग हा मराठीतील एक छंद आहे. छंद म्हणजे केवळ अक्षरसंख्येचे बंधन असलेले पद्य. 'अभंग' हा छंद महाराष्ट्रातील संतकवींनी ईश्वरभक्तिपर रचना करण्यासाठी वापरला. त्या रचनाही 'अभंग' म्हणून ओळखल्या जातात.

आख्यान : कथा किंवा गोष्ट.

आदिवासी : एखाद्या प्रदेशातील मूळचे रहिवासी.

कंजारी : एक हलकी समजली जाणारी जात. त्या जातीतील व्यक्ती.

केवडा : एक सुगंधी वनस्पती. तिचे कणीस. वनस्पतिशास्त्रातील नांव : Pandurus odoratissimus.

गवळण : गवळी जातीची महिला. परंतु तमाशात 'गवळण' हा एक भाग असतो. यात गवळणी मथुरेच्या बाजारात दही-दूध विकण्यासाठी जात असताना वाटेत कृष्ण त्यांना अडवतो. तेव्हा गवळणी व कृष्ण यांच्यामध्ये खटकेबाज, द्व्यर्थी तसेच आध्यात्मिक संवाद होतात.

ग्रामराज्य : स्वयंपूर्ण तसेच स्वयंशासित गावाची महात्मा गांधींची संकल्पना.

गुंठा : जमीनमापनाचे एक परिमाण. 121 चौरस यार्डस्.

गुंड : दुष्ट हेतूने इतरांवर जबरदस्ती करणारा.

गुंडगिरी : गुंडांच्या कारवाया.

चांभार : एक हलकी समजली जाणारी जात; त्या जातीची व्यक्ती. चर्मकार.

ढोलकी : ढोलापेक्षा आकाराने छोटे असलेले एक तालवाद्य. हे तमाशामध्ये साथीसाठी वापरतात.

तबला : एक तालवाद्य. दाया-बांया (तबला-डग्गा) असे याचे दोन भाग असतात. हिंदुस्तानी संगीताला तसेच सुगम संगीताला साथ म्हणून वापरतात.

तमाशा : नृत्य, गीत, खोटे भांडण, कथा यांचा समावेश असलेला महाराष्ट्रातील एक लोककलाप्रकार.

तमासगीर : तमाशात काम करणारा कलाकार.



तंत : मराठीतील 'तंतकवी' म्हणून ओळखले जाणारे कवी. यांच्या रचना या प्रामुख्याने लावण्या असत व त्या तमाशात गायिल्या जात. तंतकवींपैकी महत्त्वाचे कवी म्हणजे होनाजी बाळा, सगनभाऊ, अनंद फंदी, राम जोशी, प्रभाकर व हैबती.

दलित : भारतातील पददलित, मागास व अस्पृश्य वर्ग.

दांडपट्टा : एका हातात तलवार व दुसऱ्या हातात धातूचा पट्टा घेऊन केलेला व्यायामाचा प्रकार.

नमाज : मुस्लिम धर्मातील उपासना किंवा प्रार्थना.

पंडित किंवा पंत : विद्वान. प्राचीनकाळी मराठीत वृत्तबद्ध रचना करणारे कवी. त्यांनी हिंदू पुराणकथांचे आपल्या वृत्तबद्ध रचनांमधून पुनर्कथन केले. यांच्यापैकी प्रमुख कवी म्हणजे मोरोपंत, श्रीधरपंत, दासोपंत, रघुनाथ पंडित व नागेश.

प्राकृत : जी संस्कृतपासून निर्माण झाली आहे असे मानले जाते, पण जी संस्कृतपेक्षा वेगळी आहे अशी मराठी भाषा म्हणजे प्राकृत भाषा.

बुलबुल तरंग : एक प्रकारचे तंतुवाद्य.

भैया : दूध-व्यवसाय करण्यासाठी उत्तरप्रदेशातून महाराष्ट्रात किंवा मुंबईत आलेला माणूस.

जमीनदार : जमीनमालक.

जमीनदारी : जमीनदाराचा व्यवसाय, हक्क, जमीन, जमिनीवरील हक्काचा कालावधी इ.

महार : पश्चिम महाराष्ट्रातील एक हलकी, पूर्वी अस्पृश्य मानली जाणारी जात. त्या जातीची व्यक्ती.

महारवाडा : महारांची घरे / वस्ती असलेला प्रभाग.

मांग : एक हलकी, अस्पृश्य मानली जाणारी जात. प्राचीन काळी या जातीच्या लोकांना खून करविण्यासाठी किंवा फाशी देवविण्यासाठी नेमले जात असे.

मांगवाडा : मांगांची घरे / वस्ती असलेला प्रभाग.

मोगरा : एक सुगंधी फूल. वनस्पतिशास्त्रामधील नाव : Jasminum Zambac.

मोर्चा : निषेधासाठी आयोजित केलेली मिरवणूक.

मुरळी : महाराष्ट्रातील पुणे जिल्ह्यातील जेजुरीच्या खंडोबाला अर्पण केलेली स्त्री. तिचे लग्न खंडोबाशी झालेले आहे असे समजले जात असल्याने ती आजन्म अविवाहितच रहाते.

रामोशी : एक हलकी जात; त्या जातीची व्यक्ती. प्राचीन काळी त्यांच्यावर रात्री खेड्यांचे रक्षण करण्याची जबाबदारी टाकली जात असे. त्यांना दरोडेखोरही मानले जात असे.

लावणी : तमाशामधील शृंगारिक गीत. हे बहुधा तमाशातील महिला कलावती गातात.

लिंब : एक उंच, सदाहरित वृक्ष. त्याची कडू पालवी आणि साल औषधे तयार करण्यासाठी वापरतात.

लोकनाट्य : अगदी अशिक्षितांनाही समजेल अशा भाषेत लिहिलेले, सामान्यजनांच्या जीवनाशी संबंधित समस्यांवरील नाटक.

वडार : एक शूद्र जमात; त्या जमातीची व्यक्ती. हे लोक दगड फोडण्याचे व उंदीर-घुशी धरण्याचे काम करतात.

वगनाट्य : कथानक असलेले नाटक किंवा त्याचा प्रयोग. पूर्वी वगनाट्ये मुख्यतः दंतकथा, पुराणकथा किंवा लोकप्रिय लोककथांवर आधारलेली असत.

वारकरी : 1) पंथ. ब्राह्मणांच्या अतिरेकी सनातनीपणावर प्रतिक्रिया म्हणून ज्ञानदेव व नामदेव यांनी तेराव्या शतकात स्थापन केलेला पंथ. 'वारकरी पंथ' म्हणून ओळखला जाणारा हा पंथ महाराष्ट्रात व कर्नाटकात आजही सर्वाधिक लोकप्रिय पंथ आहे. महाराष्ट्रातील सोलापूर जिल्ह्यामधील पंढरपूरच्या चंद्रभागा नदीकाठी असलेला विठ्ठल हे या पंथाचे दैवत आहे.
2) या पंथातील व्यक्ती.

वर्ण : हिंदू धर्मामधील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या प्रमुख चार श्रेणी किंवा जाती.

वाघ्या : जेजुरीच्या खंडोबाला अर्पण केलेला पुरुष. मुरळीचा साथीदार.

विटा : एक प्रकारचा भाला.

शाहीर : लोककवी. पोवाडे व लावण्या लिहिणाऱ्या कवीला शाहीर असे म्हणतात.

शेष : ज्याने आपल्या माथ्यावर पृथ्वी तोलून धरली आहे असे मानले जाते, तो पुराणातील प्रचंड नाग.

शूद्र : हिंदू वर्णव्यवस्थेतील चौथा वर्ण. या वर्णातील लोक हे समाजाचे सेवक असत.

संस्कार : रिवाज; शुद्धीकरण; समारंभ, दीक्षा.

संस्थान : राजाचे आधिपत्य असलेले शहर किंवा गाव. पूर्वी भारतात अशी अनेक संस्थाने होती. भारताला स्वातंत्र्य मिळाल्यावर ही संस्थाने भारतात विलीन झाली.

सारंगी : गजाने वाजवले जाणारे फिडल्सारखे एक वाद्य.

संत : ईश्वरभक्ती करणारे, व पवित्र जीवन जगणारे. यांच्यापैकी काही कवीही होते. त्यांनी ईश्वरभक्तीपर व आध्यात्मिक रचना लिहिल्या. महाराष्ट्रातील प्रमुख संतकवी म्हणजे ज्ञानदेव, नामदेव व तुकाराम.

सत्याग्रह : 1) विरोध किंवा निषेध करण्याचा अहिंसात्मक मार्ग.
2) हवी असलेली योग्य गोष्ट करवून घेण्यासाठी अहिंसात्मक मार्गाने केलेला आग्रह.

होळी : महाराष्ट्रातील हिंदूंचा एक सण. हा सण वसंत ऋतूत येतो व त्या दिवशी अग्नीची पूजा केली जाते. ■ ■ ■

# 9

# संदर्भग्रंथ - सूची

## प्राथमिक स्रोत :

### कादंबऱ्या

1. अग्निदिव्य
2. अलगूज
3. अहंकार
4. आग
5. आघात
6. आवडी
7. कुरूप
8. केवड्याचं कणीस
9. गुलाम
10. चंदन
11. चिखलातील कमळ
12. चित्रा
13. जिवंत काडतूस
14. डोळे मोडित राधा चाले
15. तारा
16. पाझर
17. फकिरा
18. फुलपाखरू
19. मंगला
20. मयूरा
21. माकडीचा माळ
22. मास्तर
23. मूर्ती
24. रत्ना
25. रानगंगा
26. रानबोका
27. रूपा
28. वारणेचा वाघ
29. वारणेच्या खोऱ्यात
30. वैजयंता
31. वैर
32. संघर्ष

### कादंबऱ्यांवरील चित्रपट :

| मूळ कादंबरी | चित्रपटाचे नांव व वर्ष |
|---|---|
| 1. आवडी | टिळा लाविते मी रक्ताचा (1961) |
| 2. अलगूज | अशी ही साताऱ्याची तऱ्हा (1974) |
| 3. चिखलातील कमळ | मुरळी मल्हारी रायाची (1969) |

| | |
|---|---|
| 4. फकिरा | फकिरा |
| 5. माकडीचा माळ | डोंगरची मैना (1969) |
| 6. वैजयंता | बारा गावचं पाणी (1961) |
| 7. वारणेचा वाघ | वारणेचा वाघ (1970) |

**कथासंग्रह :**

1. अमृत
2. आबी
3. कृष्णाकाठच्या कथा
4. खुळंवाडी
5. गजाआड
6. गुऱ्हाळ
7. चिरागनगरची भुतं
8. ठासलेल्या बंदुका
9. नवती
10. निखारा
11. पिसाळलेला माणूस
12. प्रातिनिधिक कथा : अण्णा भाऊ साठे संपादक : एस्. एस्. भोसले (मुंबई, लोकवाङ्‌मय गृह)
13. फरारी
14. बरबाद्या कंजारी
15. भानामती
16. भुतांचा मळा
17. मास्तर
18. रानगा
19. रानवेली
20. राम-रावण युद्ध
21. लाडी
22. स्वप्नसुंदरी

**लोकनाट्ये, नाटके व नाटिका :**

| | |
|---|---|
| 1. अकलेची गोष्ट | 1945 |
| 2. खापऱ्या चोर | 1946 |
| 3. शेठजीचं इलेक्शन | 1946 |
| 4. देशभक्त घोटाळे | 1946 |
| 5. निवडणुकीत घोटाळे | 1946 |
| 6. बेकायदेशीर | 1947 |
| 7. माझी मुंबई अर्थात् मुंबई कोणाची? | 1948 |
| 8. मूक मिरवणूक | 1949 |
| 9. नवे तमाशे | 1951 |
| 10. पुढारी मिळाला | 1952 |
| 11. लोकमंत्र्याचा दौरा | 1952 |
| 12. इनामदार (नाटक) | 1956 |
| 13. बिलंदर बुडवे | |
| 14. दुष्काळात तेरावा | |
| 15. पेंग्याचं लगीन | |
| 16. अण्णा भाऊ साठे : अप्रकाशित वाङ्‌मय : संपादक : डॉ. एस्. एस्. भोसले, लेखन-वाचन प्रकाशन, (1992) | 1992 |



**पद्य**

| | |
|---|---|
| 1. शाहीर | 1952 |

**प्रवासवर्णन**

| | |
|---|---|
| 1. माझा रशियाचा प्रवास | 1965 |

## दुय्यम स्रोत :


1. कऱ्हाडे, सदा : अण्णा भाऊंचे कथाविश्व (मुंबई : प्रगत साहित्यसभा, 1970).
2. कुंभार, नागोराव (संपादक) : शाहीर अण्णा भाऊ साठे (लातूर : प्रबोधन प्रकाशन, 1993).
3. गायकवाड, आसाराम (संपादक) : लोकशाहीर तथा लोकलेखक अण्णा भाऊ साठे संदर्भग्रंथ (नासिक : झेप प्रकाशन, 1996).
4. गुरव, बाबूराव : अण्णा भाऊ साठे : समाजविचार आणि साहित्यविवेचन (मुंबई : लोकवाङ्‌मय गृह, 1991)
5. जाधव, किशोर : निळ्या आभाळातील लाल तारा : कॉम्रेड अण्णा भाऊ साठे : साहित्य आणि राजकारण (पुणे : क्रांतिसिंह नाना पाटील अकादेमी, 1995). खाजगी वितरणासाठी.
6. विटेकर, व्ही. बी. : असे होते अण्णा भाऊ साठे (चरित्र)
7. साठे, दिनकर सहदेव : हे सूर अलगुजाचे (पुणे : विद्यार्थी प्रकाशन, 1977) अण्णा भाऊंचे चरित्र.

८. साठे, शंकर भाऊ : माझा भाऊ अण्णा भाऊ (पुणे : सुगावा प्रकाशन, 1980). चरित्र.

## पी. एच्. डी. साठी सादर केलेले प्रबंध

1. गुरव, बाबूराव रामचंद्र : अण्णा भाऊ साठे : समाजविचार आणि साहित्यविवेचन. शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर, 1980.
मार्गदर्शक : डॉ. एस्. एस्. भोसले.
2. धावडे, आशा पुरुषोत्तम : अण्णा भाऊ साठे : व्यक्ती आणि वाङ्मय. नागपूर विद्यापीठ, नागपूर, 1989.
मार्गदर्शक : डॉ. यशवंत मनोहर

## अण्णा भाऊ साठे यांच्यावरील नियतकालिकांचे विशेषांक

### विशेष विभाग :

1. अस्मितादर्श (औरंगाबाद) : 1969, दिवाळी अंक, संपादक : डॉ. गंगाधर पानतावणे.
2. देवकीनंदन गोपाला (मुंबई) : जुलै 1982.
3. महाराष्ट्र मानस (मुंबई) : 1 नोव्हेंबर 1993, संपादक : ए. व्ही. पाशा.
4. युगांतर (मुंबई) : 30 नोव्हेंबर 1969, संपादक : श्रीकांत लाड.
5. लोकराज्य (मुंबई) : 1 नोव्हेंबर 1993, संपादक : दिवाकर गंधे.
6. लोकशाहीर अण्णा भाऊ साठे अमृत-महोत्सव विशेषांक (पुणे) : 1 ऑगस्ट 1995, संपादक : जगन्नाथ सकट.
7. विचारक्रांती (नागपूर) : 1977, संपादक : यशवंत मनोहर.
8. सुगावा (पुणे) : 1977, संपादक : विलास वाघ.

**टीप :** अण्णा भाऊ साठे यांच्यावर मुख्यत्त्वे मराठीत अनेक नियतकालिकांमध्ये अनेक लेख वगैरे प्रकाशित झालेले आहेत. स्थानाभावामुळे त्या सर्वांचा उल्लेख शक्य झालेला नाही.

■ ■ ■